कुमार गंधर्व

# अनूपरागविलास



मौज प्रकाशन गृह
मुंबई ४

भानुमतीला...

*जिने माझा प्रत्येक विचार व प्रत्येक कृती*
*पारखून घेतली आणि दुसऱ्या कुणापाशी जाऊन*
*पारख करवून घेण्याची गरज कधीच भासू दिली नाही. ..*
*जिने माझे विचार आपलेसे केले*
*आणि आपल्या विचारांनी माझ्यामध्ये साहस निर्माण करून*
*माझ्या विचारांना साकार केले*
*जिचे स्मरण केल्याशिवाय*
*मी कधीच काही करू शकत नाही .*

# माझे मनोगत

या पुस्तकाबाबत अगदी आरंभापासून शेवटपर्यंत मला कसलीच अडचण जाणवली नाही. राग बनवले जात नाहीत, राग बनतात. बदिशी सहज विकसतात. पण आता जेव्हा मी माझे मनोगत सांगण्याचा प्रयत्न करतो आहे, तेव्हा काय सांगावे आणि कसे सांगावे ते कळतच नाही

'अनूपरागविलासा'ला प्रस्तुतचे रूप प्राप्त करून देण्यात ज्यांनी मदत केली त्यांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे उचितच आहे पण ही सर्व माणसे निस्पृहची नसती तर किती बरे झाले असते! कारण मधुर आत्मीयतेचे संबंध असताना औपचारिक शिष्टाचार पाळणे कृत्रिमपणाचे वाटते आणि कृत्रिमता व आत्मीयता यांचा मेळ कधीच बसत नाही

माझे जाणते व आदरणीय मित्र श्री० वामनरावजी देशपांडे यांनी माझी विनंती मान्य करून अत्यंत परिश्रमपूर्वक जी प्रदीर्घ प्रस्तावना लिहिली आहे, त्याबद्दल त्यांचे आभार कसे मानू? मी तर स्वतःला त्याच्या आशीर्वादाचा अधिकारी समजतो

श्री० श्रीकृष्ण पुरुषोत्तम भागवत आणि त्यांची 'मौज प्रकाशन गृह' ही सध्या मराठी प्रकाशनव्यवसायामध्ये चांगलीच ख्यातनाम आहेत. 'अनूपरागविलासा'च्या द्वारे ते हिंदी प्रकाशनक्षेत्रात पदार्पण करीत आहेत तसेच हे त्यांचे पहिलेच 'संगीत' प्रकाशन आहे. अशा रीतीने त्यांनी माझा दुहेरी सन्मान केला आहे. मी कृतज्ञ आहे.

या दोघांच्या शिवाय माझे प्रिय मित्र श्री० राहुल बारपुते यांनी मूळ मराठी प्रस्तावनेचा हिंदीमध्ये अनुवाद केला व आपले मित्रकर्तव्य पार पाडले. मी त्याबद्दल त्यांचे आभार मानीत नाही ते माझे फार जिव्हाळ्याचे सुहृद आहेत. त्यांनी यापुढे अशीच मित्रकर्तव्ये पार पाडावीत, अशी इच्छा मात्र व्यक्त करतो

डिसेंबर १९६४
भानुकुल,
माताजी का रास्ता
देवास (म० प्र०)

कुमार गंधर्व

# कुमार गंधर्व : गायक आणि गायकी

माझे तरुण गायकमित्र श्री० शिवपुत्र कोमकाळी ऊर्फ श्री० कुमार गंधर्व यांनी आपल्या प्रस्तुत बंदिशींच्या[1] संग्रहाला प्रस्तावना लिहावयास मला सांगितल्यामुळे मी सन्मानित झालो आहे 'संगीतसृष्टीतले प्रश्नचिन्ह' म्हणून त्यांचे सार्थ वर्णन गोविंदराव टेंबे यांनी पचवीस वर्षापूर्वीच करून ठेवले आहे तर इतरांनी त्यांचा उल्लेख 'संगीतसृष्टीतील एक उद्गारचिन्ह' असाही केलेला आहे एवंगुणविशिष्ट अशा कुमारांनी काय धोरणाने ही कामगिरी माझ्यावर सोपविली हाही एक प्रश्नच आहे कदाचित स्वत त्या आधीच्या पिढीच्या एखाद्या अभ्यासकाला आपल्या कृतींविषयी काय वाटते हे त्यांना अजमावयाचे असेल ते कसेहि असो सन्मान फार मोठा आहे पण त्याबरोबरच त्यांनी माझ्यावर टाकलेली जबाबदारीही तितकीच मोठी आहे कारण या संग्रहाभोवती फार मोठे संगीत विषयक प्रश्न निर्माण होतात त्या सर्वांची शहानिशा करणे हे काम सोपे नाही पण यथाशक्ती प्रयत्न तरी करणे भाग आहे

आजपर्यंत चिजांचे संग्रह पुष्कळच प्रसिद्ध झाले इतकेच नव्हे तर संगीतविषयक वाङ्मयात अशा गीतसंग्रहाचाच भरणा प्रामुख्याने आढळून येतो मराठीपुरतेच बोलावयाचे म्हटले तरी तीत कै० पंडित भातखंडे, पं० विष्णु दिगंबर प्रभृतींपासून तो विद्यमान पं० मिराशीबुवा, पं० विनायकराव पटवर्धन, श्री० मास्तर कृष्णराव, प्रा० बा० र० देवधर, पं० रातंजनकर प्रभृती अनेक मान्यवर कलावंतापर्यंत अनेकांनी आपापले संग्रह प्रसिद्ध करून महनीय कामगिरी करून ठेवली आहे. आणि संगीतप्रांतात कै० पं० भातखंडे यांच्यानंतर विवेचक व चिकित्सक वाङ्मयाचे कितीही दुर्भिक्ष्य असले तरी चिजांचे संग्रह मात्र विपुलतेने आढळतात यात शंका नाही तेव्हा कोणालाही प्रश्न असा पडेल की आधीच अशा संग्रहांची इतकी समृद्धी असताना त्यात आणखी या संग्रहाची भर कशाला?

या प्रश्नाचे उत्तर असे की आजपर्यंतचे संग्रह हे बहुशी 'संकलनात्मक' होते तर प्रस्तुत संग्रह हा 'creative' म्हणजे सर्जनात्मक आहे, आमूलाग्र 'नवनिर्मिती' आहे त्यात बंदिशींची संख्या एकूण १३६ आहे व त्या सर्व खरोखरच 'बंदिशी' या संज्ञेला पात्र आहेत यांपैकी १०७ बंदिशी ५७ जुन्या रागांतील असून १७ बंदिशी कुमारांनी स्वत च केलेल्या व अगदी नवीनच अशा ११ रागांतील आहेत शिवाय १२ रागरूपे जुन्याच दोन अगर अधिक रागांचे मिश्र अगर जोड राग करून बनविलेली असून त्यांतील प्रत्येकात एक अशा १२ बंदिशीही त्यांनीच केलेल्या आहेत एकूण, काही जुने राग

---

१ 'बंदीश' हा शब्द 'उत्तम बांधलेली चीज' अथवा 'एखाद्या गायकाच्या गायकीची चुस्त अंतर्गत बांधणी' या दोन्ही अर्थांनी वापरला जातो.

पण नव्या बंदिशी, काही नवीन राग व नवीन बंदिशी आणि काही नवीन जोडस्वरूपे व नवीन बंदिशी असे या संग्रहाचे सर्वसाधारण स्वरूप आहे. इतक्या विपुल प्रमाणावर नवनिर्मिती व ती टीका लिहून, नोटेशन करून आणि छापून प्रसिद्ध केलेली अशी माझ्या तरी पाहण्याऐकण्यात नाही.

अशा तऱ्हेचा नवनिर्मितीचा प्रयत्न अर्थातच अगदी नवीन नाही. पण त्या प्रयत्नाचा पूर्वेतिहास मात्र विशद करण्यासारखाच आहे. काहींनी नवीन राग बनविण्याचा चंग बांधला व त्या नवीन रागांना 'महामाया', 'आई भवानी' अशांसारखी नावेही देऊन पाहिली, पण क्षणभर कौतुक होण्यापलीकडे त्यातून फारसे काही हातात पडले नाही. काहींनी जुन्याच रागात का होईना, पण नवीन चिजा करून पाहिल्या, पण त्या मैफलीत गावयाचे स्वत:च सोडून दिले. काहींनी नव्या चिजा तयार करून जुन्याच चिजांच्या संग्रहामध्ये मधूनमधून पेरून पाहिल्या, पण त्या फार उगवल्या नाहीत. काही चिजा कलाकारांनी गाऊनही पाहिल्या, पण त्यांच्या शिष्योत्तमाकडूनही त्या कधी गायल्या गेल्या नाहीत. अशी ही एकूण नवनिर्मितीची सर्वसाधारण कहाणी आहे.

ह्यालाही काही आदरणीय अपवाद आहेत. म० अल्लादियाखाँ, फैयाजखाँ, विलायतखाँ आग्रेवाले वगैरेंनी बांधलेल्या सुंदर सुंदर चिजा त्यांच्या त्यांच्या शिष्यवर्गाकडून आजही ऐकावयास मिळतात तसेच विद्यमान कलाकारांतही मास्तर कृष्णराव, श्री० जगन्नाथबुवा पुरोहित व प० रातंजनकर यांच्याही चिजा अतिशयच प्रिय झालेल्या आहेत. या सर्व कलाकारांनी त्या आपापल्या शिष्यांना शिकविलेल्या आहेत व ते शिष्य त्यांच्या शिष्यांना आजही शिकवीत आहेत. सर्वांच्या कृती चटका लावणाऱ्या अशा झाल्या असून त्यांचा प्रभाव आवर्जून सांगण्यासारखा आहे. आणि प्रस्तुत विषय त्या कलाकारांचा नसला तरी त्या सर्वांचा येथे आदराने उल्लेख करणे न्यायाचेच होईल.

या सर्व विवेचनाचा अर्थ असा नव्हे की प्रत्येक कलाकाराने नवीन चिजा अथवा नवीन राग बांधलेच पाहिजेत कलाकार म्हणून, मैफलीतला यशस्वी गायक म्हणून, या गोष्टीची आवश्यकता नाही हेही तितकेच खरे आहे. प्रत्येक महान कलाकाराने नवीन राग अथवा नवीन चिजा केल्या होत्या असा इतिहासाचाही दाखला नाही. इतकेच नव्हे तर जुन्याच घराणेदार चिजांचा संग्रह या कलाकाराजवळ इतका विपुल होता की नवीन राग अथवा नवीन चिजा करण्याची त्यांना आवश्यकताही वाटली नसावी कारण जुन्या परंपरागत चिजांमध्येही त्यांच्या कलात्मकतेचा विकास करण्याचे भरपूर सामर्थ्य होते.

जुन्या घरंदाज चिजा मिळविण्याचा जन्मभर खटाटोप करून, त्यांचे आकार-उकार ठरवून, स्वरावली निश्चित करून, त्यांच्या रागांचेही ज्यांनी काही वर्गीकरणही करून ठेवले, त्या पंडित भातखंडे यांचे स्मरणही या ठिकाणी अगत्याने केले पाहिजे. तसेच सदारंग, अदारंग, मनरंग, हररंग वगैरे पूर्वसूरींचे, ज्यांच्या शेदोनशे वर्षांपूर्वी बांधलेल्या चिजा आजतागायतही गायल्या जात आहेत, त्या श्रेष्ठ रचनाकारांचे ऋणही मान्य करणे आवश्यक आहे आणि आज ज्यांना आपण जुन्या परंपरागत चिजा म्हणतो त्याही त्या त्या वेळच्या नवनिर्मितीच होत्या हेही विसरून चालणार नाही

पण पंडित भातखंडे आदी संग्राहकांनी एवढे प्रचंड कार्य केले तरी त्यांच्या ग्रंथात

पूर्वसूरींनी केलेल्या अस्सल चिजा किती, त्यांच्या स्वरावली जशा त्या निर्मात्यांनी बनविल्या त्यांची सचाई पं० भातखंडे यांच्या हातात येईपर्यंत किती शिल्लक राहिली, चिजेच्या पाठात किती अपभ्रंश समाविष्ट झाले, वगैरे महत्त्वाचे प्रश्न उभे राहतात. सांगण्याचा मुद्दा असा की शेदोनशे वर्षांच्या कालखंडांत त्या त्या वेळच्या नवनिर्मितीचे स्वरूप आमूलाग्रही पालटले नसेल काय ? श्री० कुमारांच्या प्रस्तुत संग्रहाच्या बाबतीत मात्र अशा कोणत्याही शंकेला थारा नाही. त्यांची सर्व निर्मिती त्यांनी स्वतः केलेली, स्वतः लिहिलेली व स्वतःच स्वरावलीत बसविलेली असल्यामुळे त्यात भ्रष्टाचाराला जागाच नाही. ती अगदी ताजी आहे.

पण बहुतेक नवनिर्मितींना त्यांच्या त्यांच्या बाळपणाच्या व्यथा असतात. त्यातली एक महत्त्वाची अशी की हे सर्व नवीन राग व नवीन बंदिशी प्रत्यक्ष मैफलीत टिकतात की नाही ? आताच सांगितल्याप्रमाणे बऱ्याच कृती बाल्यावस्थेतच नाहीशा होतात. कारण त्या मैफलीच्या धर्मसभ्यावर टिकत नाहीत. आणि या बाबतीत कुमारांचे यश खरोखरीच डोळ्यात भरण्यासारखे आहे यात शंका नाही. या संग्रहातील प्रत्येक चीज व प्रत्येक राग त्यांनी आपल्या अगणीत मैफलींतून अनंत वेळा गाऊन त्यांची कसोटी पाहिलेली आहे. इतकेच नव्हे तर आपल्या मैफलींतून जुन्या चिजांपेक्षा स्वतःच केलेल्या चिजा वैपुल्याने गाण्याची त्यांना हौस आहे. अशा तऱ्हेचे आपल्या सर्व चिजांचे आणि रागांच्या यशाचे भारंभार माप पदरात घेऊनच त्यांनी त्या या संग्रहात समाविष्ट केल्या आहेत.

संगीतामध्ये नवनिर्मिती म्हणजे काय असा एक मूलभूत प्रश्न येथे निर्माण होतो, आणि कुमारांच्या निर्मितीच्या संदर्भात त्याचा विचार होणे आवश्यक आहे. कोणीही गायक व्यासपीठावर बसून गावयास लागतो तेव्हा ती सर्व कृती नवनिर्मितीच असते असे म्हटले जाते. इतकेच नव्हे तर पाश्चात्य संगीत व आपले भारतीय संगीत यांच्यामधला भेद दाखविताना आमचे गायन 'उत्स्फूर्त' असते आणि पाश्चात्यांचे तसे नसते, म्हणजे ते एखाद्या रचनाकाराने आधीच ठरवून ठेवलेले असते, या वैशिष्ट्यावरच घोट ठेवले जाते. परवा, गेल्या ऑगस्ट १९६३ मध्ये, एडिंबरो येथे झालेल्या संगीतमहोत्सवात आणि फेब्रुवारी १९६४ मध्ये दिल्ली येथे झालेल्या 'ईस्ट अँड वेस्ट संगीतमहोत्सवा'त देशोदेशीच्या पाश्चात्य संगीतज्ञांनीही भारतीय संगीत नावाजले ते प्रामुख्याने त्याच्या उत्स्फूर्तपणाबद्दलच. आणि आजही आपल्या संगीतात 'हार्मनी' आणण्यात आमचे हे मोठे वैशिष्ट्य गमावून बसू की काय याचीच सर्वांना धास्ती आहे.

हे सर्व खरे असले तरी निर्मितीचा हा एक प्रकार झाला. यहून नवीन बंदिशींची व नवीन रागांची निर्मिती हा आणखी एक प्रकार झाला. पण ज्यांनी गायकीच्याच जुन्या पाउलवाटा अगर राजरस्ते नाकारून नवीन वाटा पाडल्या व आपल्या हयातीतच त्यांना राजरस्त्याची प्रतिष्ठा मिळवून दिली, त्यांनीसुद्धा नवनिर्मितीच केली असे म्हणावयास हवे. खाँसाहेब अब्दुल करीमखाँ अगर खाँसाहेब अल्लादियाखाँ यांनी स्वतःची स्वतंत्र गायकीच निर्माण केली, ती आपापल्या शिष्यामध्ये संक्रमित केली व त्या शिष्यांनी पुन्हा त्यांच्या शिष्यास शिकविली, त्या या खासाहेबद्वयांनी नवनिर्मितीच केली नाही काय ?

त्यांचे हे अपूर्व यश नवनिर्मितीच्या सदरात घालून त्यांना फार मोठे मानाचेच स्थान द्यावयास हवे

व्यासपीठावर बसून गाणारा कोणीही गायक नवनिर्मितीच करतो असे आताच म्हटले पण हा गायक नवनिर्मिती करतो म्हणजे नक्की काय करतो? तर तो स्वत आपल्या गुरुजींच्या अगर इतर गायकांच्या गळ्यातून आलेल्या व स्वत ला आवडलेल्या विटा म्हणजे स्वरांची स्मृतीत ठेवून देतो व स्वत च्या गळ्यावर घासवितो असे अनेक स्वरसमूह तो एकसारखा जमवीत असतो व त्यात लहानमोठ्या अशा अनंत आकारांच्या व उच्चारणाच्या विटा स्वत जवळ तयार ठेवीत असतो मग तो व्यासपीठावर बसला म्हणजे आधीच बनविलेल्या विटा जरूर तेथे काढूनछाटून त्या एकापुढे एक अशा, काही योजनेने, ठेवीत असतो या सर्व विटा त्याने स्वत पाडलेल्या बहुशी नसतात. त्याचे काम वेगवेगळ्या आकाराचे हे तुकडे घेऊन, जरूर तर त्यांची काटछाट करून, त्यांचा फक्त साधा जोडण्याचेच राहते म्हणजे माल जुनाच, इतरांच्याकडून अथवा परंपरागत आलेला असाच असतो गायक फक्त त्याची रचना वडी करावयाची एवढेच पाहतो अशा निर्मितीला निर्मितीचा खालचा स्तर म्हणता येईल पण नवीन गायकीचीच निर्मिती करणारा कलावंत हा या विटासुद्धा स्वत च निर्माण करीत असतो आजपर्यंत वापरात आलेल्या विटांचा तो त्याग करतो, आणि काही नवीनच आकाराच्या, नवीन घडणीच्या, नवीन सामग्रीच्या, वेगवेगळ्या घनतेच्या, भिन्न नादांच्या, निरनिराळ्या ध्वनींच्या आणि वेगळ्याच रंगाच्या, त्याला स्वत ला जे काही करावयाचे असेल त्याला उपयोगी पडतील अशा, नव्याच विटा तो स्वत च पाडीत असतो आणि याच कृतीला 'नवनिर्मिती' असे अधिक चांगल्या अर्थाने म्हणत येईल निर्मितीचा हा वरचा स्तर कल्पिता येईल. कुमारांच्या बाबतीत सांगण्यासारखी गोष्ट अशी की या विटाही त्यांनी स्वत च तयार करून घेतल्या, स्वत च्या मनाजोग्या घडवून घेतल्या, व त्यांचा वापरही मुक्तहस्ताने केला एकूण, जुन्या कलाकारांच्या अपेक्षेने कुमारांनी साधा जोडण्याचे काम तर केलेच पण त्यांच्या मनात असलेली कृती सिद्ध होण्याकरिता भिन्न भिन्न घडणीच्या, उच्चारणाच्या व नादांच्या स्वरवेली स्वत पुरत्या तरी तयार करून घेतल्या असे म्हणता येईल थोडक्यात म्हणजे कुमारांनी नवीन गायकीचीही निर्मिती केली

म्हणजे कुमारांचे नवनिर्मितीचे क्षेत्र ऐसपैस आहे असे म्हणता येईल त्यांनी नवीन राग केले, नवीन बंदिशी बांधल्या व नवीन गायकीही निर्माण केली. खरे म्हटले म्हणजे हे गणित उलट्या रीतीने मांडणे अधिक सुगम होईल म्हणजे त्यांनी नवीन गायकी निर्माण केली, नवीन राग तयार केले व नवीन बंदिशी बांधल्या असेच म्हटले पाहिजे कारण त्यांच्या नवीन रागांचा व नवीन बंदिशींचा जन्म त्यांच्या नवीन गायकीतूनच झाला आहे असे मला वाटते (सवच नवीन रागांचा व नवीन बंदिशींचा जन्म असाच होतो असे मात नाही कारण काही ख्यातनाम गायकांनी केलेले नवीन राग अगर नवीन बंदिशी त्यांच्या जुन्या गायकीतूनही निर्माण झालेल्या आहेत ) याखेरीज जुन्या रागांमध्येही त्यांनी काही फेरबदल केले, ज्यांचा विचार पुढे करावयाचाच आहे पण या सर्वांचा अर्थ एकच होतो तो असा की कुमारांची कलात्मक नजरच वेगळी आहे, धारणाच नवीन आहे

कुमारांच्या कृतीचे आणखी एका दृष्टीने परिशीलन करणे जरूर आहे. ती अशी की आतापर्यंतच्या कलाकारांनी चिजेची कविता बहुश परंपरागत आलेलीच वापरली. अल्लादियाखाँ, फैयाजखाँ, विलायतखाँ वगैरेंनीही तशी अर्थातच नवीन कविताही केली, व तिला स्वरबद्ध करून तिचे बंदिशींमध्ये रूपांतरही केले. पण त्या बंदिशी त्यांच्या त्यांच्या शिष्यवर्गातच राहिल्या. ग्रंथरूपाने छापल्या जाण्याचे त्यांच्या नशिबी नसल्यामुळे, हळहळ व्यक्त करण्यापलीकडे आपण काहीही करू शकत नाही. त्याचीही कारणे आहेत, पण त्यात आपणास शिरावयाचे नाही कुमारांचे मात्र वैशिष्ट्य असे की या बंदिशींची सर्व कविता पूर्वसूरींप्रमाणे त्यांनी स्वत च केली.

ही जी कुमारांनी कविता केली ती 'काव्य' म्हणून अर्थातच नव्हे. इतकेच नव्हे, तर ती 'काव्य' म्हणून वाचली जावी अशी त्यांची स्वत चीही अपेक्षा नाही. संगीता करिता केलेल्या कवितेतले काव्य अगर तिचा शब्दार्थ हा निव्वळ आनुषंगिक, अगदी गौण असा भाग असून खरे महत्त्व तिच्या स्वररचनेला असते. चिजेची तारीफ तिच्यातील काव्याकरिता सहसा होत नाही ती तिच्या स्वररचनेकरिता, बंदिशीकरिताच होत असते. आणि ही स्वरांची बांधणी गोंडस दिसावी, उठून दिसावी म्हणून तिच्या शब्दातील भाषिक स्वर-व्यंजनांची उच्चारणक्षमताही तशीच समर्थ आणि प्रभावशाली असावी लागते. कोणत्या स्वरावर थांबावयाचे आहे, कोणता स्वर किती लांबवावयाचा आहे, कोणत्यावर लयीचे आंदोलन घ्यावयाचे आहे, कोणत्या स्वरावर आघात आणि तो किती जोरकस अथवा नाजूक द्यावयाचा आहे वगैरे दृष्टीनीच तिच्या शब्दांची म्हणजे स्वर-व्यंजनांची आणि त्यांच्या आकार-उकारांची मांडणी चिजेत असावी लागते कारण तिने स्वर विलासाला व स्वरविकासालाच मुख्यत वाव द्यावयाचा असतो. म्हणून कवीचे कवित्व आणि गायकाचे कवित्व या दोन गोष्टी अगदी भिन्न आहेत. गायक कवीला कवी म्हणत नाहीत. त्याला पारिभाषिक शब्द 'वाग्गेयकार' असा आहे. जरा खोल पाहिले तर असे आढळून येईल की गायकाच्या कवितेची निर्मिती ही काव्यानंदासाठी नसते. ती फक्त संगीतानंदासाठी, संगीताचा एक अविभाज्य घटक म्हणून असते. प्रत्येक कलेची माध्यमे वेगळी असतात आणि आनंदहेतू साध्य करण्याचे त्यांचे मार्गही भिन्न असतात या दृष्टीनेच संगीताच्या कवितेला 'कविता' म्हणत नाहीत, तिला 'चीज' असाच खास शब्द आहे.

पण चिजेच्या शब्दांना अर्थही असतोच आणि तो सुरवातीस चीज मांडताना, आणि नंतर गायनातही मधूनच एखादे वेळी डोकावतो त्याचे कार्य काय आहे असा मग प्रश्न उद्‌भवतो. त्याचे उत्तर असे की या शब्दार्थांतूनही एक प्रकारची संगीतोपयोगी भावस्थिती (mood) निर्माण व्हावी व तिच्यातून काव्य साकार होण्याऐवजी गायनालाच स्फूर्ती मिळावी अशी योजना असते. ही भावस्थिती अगदी बीजरूपच असते म्हणून तिला संगीताच्या भाषेत 'रंगबीज' असे म्हणावे या रंगबीजातूनच पूर्णपणे मोहरलेला, बहरलेला व सुफलित झालेला संगीताचा वृक्ष निर्माण व्हावयाचा असतो याचाच दुसरा अर्थ असा की, शब्दार्थाने एकदा ते रंगबीज प्रस्थापित केले म्हणजे आपले कार्य झाले असे समजून बाजूला झाले पाहिजे संगीताची उभारणी होताना शब्दार्थ असा मागेच टाकला जातो, जावयाला पाहिजे. त्याला संगीताने

खाऊनच टाकले पाहिजे व त्या शब्दार्थानेही खाले जावयाला पाहिजे. म्हणजे खाणे जाण्याची क्षमता त्या शब्दार्थामध्ये पाहिजे. तरच त्या संगीताचा संगीत म्हणून विस्तार, विलास होईल. म्हणून संगीताकरिता चीज करणे हे कवींचे क्षेत्रच नाही. ते काम गायकाचे, मुरलेल्या गायकाचे आहे. त्यातील शब्दांचा अर्थ हा अगदी दुय्यम स्वरूपाचा असावा लागतो: असा की संगीताच्या ओघात सहजतया मागे टाकला जावा. त्यात काव्यदृष्ट्या समर्थ आणि प्रभावी शब्दरचना असून चालत नाही. नाही तर तो शब्दार्थ मागे टाकला जाणार नाही आणि गायकाचे लक्ष स्वत वरच वेधून घेऊन त्याच्या संगीताच्या विलासाला आणि विस्ताराला दर वेळी अडथळा निर्माण करील. या संदर्भात संगीताकरिता शब्दरचना कशी असावी याबद्दल पाश्चात्य संगीतज्ञ रॉबर्ट शूमन याने केलेले विवेचन मोठे मार्मिक असून आपल्यालाही ते मार्गदर्शक होईल म्हणून त्यातले एक छोटेसे अवतरणच खाली देतो. गटेच्या काव्याला जोसेफ क्लीन या रचनाकाराने दिलेल्या संगीतावर टीका करताना शूमन म्हणतो :

**"To speak frankly, it seems to me that the composer has too much respect for his (Goethe's) poem, as though he were afraid to hurt it, seizing it too ardently. So at every step we find rests, hesitations, and embarassments. But the poem should lie like a bride in the minstrel's arms, free, happy and entire. Then it sounds like something from heaven, from heaven afar."**

["स्पष्टच सांगावयाचे झाले तर संगीतकाराला कवितेविषयी फाजील आदर वाटत आहे असे वाटते. जणू काही तिच्याशी अतिप्रसंग होत आहे की काय अशी त्याला सारखी भीती वाटत आहे. त्यामुळे त्याच्या संगीतरचनेमध्ये दर वेळी अटकाव, संकोच आणि भीतीच प्रतीत होते. पण कविता ही गायकाच्या बाहुपाशात एखाद्या प्रेयसीसारखी निर्बंध आणि नि संकोचपणे, स्वत.च्या सर्व अंगप्रत्यंगाचे समर्पण करण्यात आनंद *मानणारी असावी. मगच ते संगीत स्वर्गीय होईल."*]

ह्याचा अर्थ असा की गटेची कविताच इतकी प्रभावी होती की त्यामुळे संगीत-काराची त्याने कुचंबणाच झाली व त्यामुळे संगीताचा संगीत म्हणून तेथे विकासच होऊ शकला नाही. असो.

अगदी असाच तऱ्हेची भावस्थिती चिजेच्या रागातून, स्वररचनेतून अथवा बंदिशीतूनही निर्माण होत असते हे गायकांना सांगण्याची आवश्यकता नाही. येथे मुख्य मुद्दा असा की जी काही भावस्थिती शब्दार्थातूनही व्यक्त होईल, ती त्याच्या स्वररचनेतून होणाऱ्या भावस्थितीशी एकरूप असावयास पाहिजे. पण प्रत्यक्ष अनुभवामध्ये मात्र असे क्वचितच आढळते उलट स्वररचनेतील भावस्थिती वेगळी आणि शब्दार्थातून व्यक्त होणारी भावस्थिती वेगळी असाच सर्वसाधारण अनुभव येतो. याचे कारण असे की शे-दोनशे वर्षांच्या अवधीत या जुन्या चिजांवर वेगवेगळ्या घराण्यांतून, वेगवेगळ्या गायकांकडून वेगवेगळे संस्कार झाले. त्यातच चिजांचे या घराण्यातून त्या घराण्यात असे प्रवासही झाले. अर्थातच हा प्रवास होताना प्रत्येक घराण्याने चिजेची मूळची

बंदीश बदलून ती स्वतःच्या घराण्याला साजेशी बनवून घेतली. प्रत्येक घराण्याची आलापचारी वेगळी, लयकारी भिन्न आणि आघाताची जात व वजनही निराळे. त्यामुळे नवीन घराण्याचा रंग उचलताना चिजेचे एकूण स्वरूपही पालटले गेले आणि तिची स्वररचनाही क्वचित बदलली गेली. शिवाय पुष्कळ गायकांनी नवीन नवीन रचनेच्या मोहक चाली बनविल्या. पण त्या गुंतवून टाकण्यासाठी स्वतंत्र शब्दरचना करण्याचा व्याप करण्यापेक्षा प्रचारात असलेल्या चिजेचेच शब्द घ्यावेत व तेच नवीन केलेल्या बंदिशीत गुंतवून मोकळे व्हावे असा सोपा मार्गच बहुतेकांनी अनुसरला. म्हणून एकच चीज कधी कधी वेगवेगळ्या रागात आढळते. परिणामी चिजेच्या अर्थाची भावस्थिती व स्वररचनेची भावस्थिती यांच्यामध्ये काही मेळच उरला नाही. आणि शब्दार्थ हा गायनातील स्वरांच्या विलासात आणि विस्तारात मागेच पडत असल्यामुळे त्याचे महत्त्वही कोणाला न वाटणे स्वाभाविक होते.

पण नवीन नवीन चिजा बनविणाराला, त्याची स्वररचना त्याच्या शब्दासकट करणाराला, या सर्वसाधारणतः उपेक्षिल्या जाणाऱ्या बारीक गोष्टीकडेही लक्ष पुरवावे लागते. आणि असा रचनाकार चोखंदळ असला म्हणजे तो चिजेची कविता करताना तिच्यामधील शब्दार्थांचा भाव तिच्या स्वररचनेच्या भावाशी एकरूप आहे याचीही दक्षता ठेवीत असतो. प्रस्तुत संग्रहातील एकूण एक चीज कुमारांनी या दृष्टीने अत्यंत काटेकोरपणे तावूनसुलाखून घेतली आहे. यातील पुष्कळशा चिजा लेखकानेही स्वतः ऐकल्या आहेत व काही चिजा तर वारंवार ऐकल्या आहेत. त्या दृष्टीने कुमारांच्या नवीन बंदिशींच्या शब्दांची रचना व स्वरांची रचना यांची रक्तिबीजे एकरूप आहेत असे म्हणण्यात काही धाडस होत आहे असे त्याला वाटत नाही.

ही किमया कुमारांना कशी साध्य झाली असा कोणाला प्रश्न पडेल. पण चीज बनविण्याची प्रक्रिया काय होते, निदान कुमारांच्या बाबतीत ती काय झाली, याचा थोडासा कानोसा घेणे जरूर आहे. त्यांचे स्वतःचे या बाबतीतले कथन मी महत्त्वाचे समजतो. त्यांचे म्हणणे असे की, एखादे दृश्य त्यांना प्रवासात अगर इतरत्र दिसते अथवा एखादी घटना समोर घडते. ते दृश्य म्हणजे एखाद्या पहाडासमीपचा दोन नद्यांचा संगम असो, अगर रस्त्याच्या दुतर्फा लागलेली वसंतऋतूतली, लाल फुलांचे संपूर्ण आवरण घेतलेली पलाश वृक्षांची रांगच रांग असो, अथवा ती घटना एखाद्या कालीच्या मंदिरामध्ये बकऱ्याचा बळी दिला जात आहे अशी असो अगर एखादी परिचित तरुणी ओळख असून ती दाखवीत नाही अशी असो. ते एकदम काहीतरी गुणगुणावयाला लागतात व असे गुणगुणता गुणगुणता चिजेचे शब्द व स्वररचना त्यांना एकदमच स्फुरतात. कै० गोविंदराव टेंब्यांचा नाटकाच्या चाली करण्याचा अनुभवही असाच होता. फरक इतकाच की, ते दृश्य अथवा घटना प्रत्यक्षातील असण्याऐवजी नाटकातील असावयाची. एकूण मुख्य मुद्दा आपण एवढाच घ्यावयाचा की, चिजेची स्वररचना व शब्द हे एकाच वेळी स्फुरावयास पाहिजेत. निदान कुमारांना तरी ते तसेच स्फुरले आहेत. म्हणूनच त्यांच्या स्वररचनेचा 'मूड' व शब्दार्थाचा मूड यांचा बेमालूम मेळ बसलेला आहे. चिजेच्या एकूण विस्तारात सर्व जागी मिळून केवळ मिनिट दीडमिनिटाचेच अस्तित्व लाभणाऱ्या व अगदी

चिनमहत्त्वाच्या गणल्या गेलेल्या घटनांकडेही कुमार किती चाटेरोरपणाने पाहतात आणि त्याचे सागीतिक घटनात रूपांतर कसे करतात याचेच हे निदर्शक आहे

कुमारांच्या प्रस्तुत समहाच्या संदर्भात सांगावयाचे एवढेच की, खास गायनाकरिता जशी चीज असावी तशीच ती आहे, आणि तिच्यामध्ये स्वररचनेचा आणि शब्दार्थाचा मेळही बसलेला आहे. आणि या अनुरोधानेही या समहातल्या सर्व कृतींकडे पाहिले जावे.

चिजेच्या शब्दार्थाचे कार्य एखादी भावस्थिती अगर संगीतोपकारी भूमी निर्माण व्हावी असे म्हटल्यावर कुमारांच्या चिजांमध्ये विषय जरी काय आले आहेत ते सागणे ओघानेच आले. त्या दृष्टीने त्यातील मुख्य विषय म्हणजे ईशप्रार्थना, श्रीशंकराचे स्तवन (श्रीशंकरावर कुमाराची भक्ती आहे), सरस्वतीस्तवन, गुरूचे स्तवन, संगीताचे वर्णन, ऋतुवर्णन, विशेषत वसतऋतूचे वर्णन, शृंगार, विरहिणीची व्यथा, शामसुंदराची बासरी, इत्यादि प्रत्येक ठिकाणी स्वररचना व शब्दार्थ याचा मेळ साधला आहे की नाही हे ज्याचे त्यानेच नोटेशनवरून चीज गुणगुणून पाहावयास पाहिजे नमुन्यादाखल काही उदाहरणे देणे उचित होईल

ईशप्रार्थना असलेली, पान छत्तीसवरील कल्याण रागातील चीज त्यांच्या रचनेचा नमुना म्हणून सागता येईल

स्थाई

देवो दान मोहे
माँगत सुर भीक, दास तेहारो ॥

अतरा

तोरे बिन ग्यान दे कौन मो सो
नेक नजर मो पर, आस तेहारो ॥ १ ॥

आणखी एक लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट अशी की कुमाराना नव्या रचना करण्याची बुद्धी झाली ती अर्थातच त्यांच्या शेकडो जुन्या परपरागत चिजांच्या अभ्यासानेच खानदानी चिजांचा त्यांचा सग्रह मोठा, चाहरास चांगली व परिशीलन खोल नाहीतर असासारख्या चिजा त्याना करणेच शक्य नव्हते विशेषत श्रीशंकरस्तवनाची, पान तेहेतीसवरील, खालील चीज पाहावी

स्थाई

शिव शिव कल्याण करी, जप जप प्रिय नाम शिव
हर हरत दुख सबै, रट रट सुखद नाम ॥

अतरा

जप करत सुरगन, महादेव, महादेव
शिव करत कल्याण, रट धरो नाम शिव ॥

यातील शब्दरचना अवश्य पाहावी. एकच शब्द पुन्हा पुन्हा वापरण्याची पद्धत व त्यामुळे उच्चारण तर मारखेच, पण स्वरावली मात्र भिन्न भिन्न, त्यामुळे त्या नादमधुरतेलाही एक वेगळीच चव असते

पान तीनवरील विलासखानीची खालील चीज पाहावी :

स्थाई
नयन में जल भर आये देखत तोहे
काहे पिया नहीं देत दरस मोहे ॥

अंतरा
शोक[1] मन छाये, याद तरसाये
कैसे धरूं धीर, देवो दरस मोहे ॥

विरहिणीची ही आर्ततेची हाक ऐकून कोणालाही विलासखानीची आठवण व्हावी यात काय नवल ?

संगीताची आस व सरस्वतीची प्रार्थना म्हणून पान चोवीसवरील खालील भीमपलासातील नमुना ध्यानात ठेवण्यासारखा आहे.

स्थाई
सब सुर साधे जब भयो पार
मिल नर नारी लय कर गान ॥

अंतरा १
सुरलय साथ करो दोऊ एक
तरो सुर-सिंधु जब भयो पार ॥

अंतरा २
शोक तज आज सुरसती गाय ।
करो रट नाम करे लय पार ॥

सूर आणि लय दोन्ही एकरूप करून सुरसिंधू तरू इच्छिणारा हा गायक 'सुरसती' चे म्हणजे सरस्वतीचे नामस्मरण करावे असे सांगतो. येथे स्वर व लय एकरूप करण्याची कल्पना व 'सरस्वती'चे 'सुरसती' असे संगीतमय व संगीतरम्य रूपांतर सुचलेल्या गायकाखेरीज कुणाला सुचेल काय ?

असो. एक महत्त्वाची गोष्ट पुन्हा आवर्जून सांगणे आवश्यक आहे. ती अशी की शब्दार्थातून दिग्दर्शित होणाऱ्या भावस्थितीविषयी मी इतके विवेचन केले तरी शब्दार्थाचे अभिजात संगीतातले स्थान अगदी दुय्यम स्वरूपाच, गौण व आनुषंगिकत्वाच्याच नात्याच असते हे विसरता उपयोगी नाही. नाहीतर ती चीज म्हणून न राहता तिचे 'भावगीत'च होईल. कुमारांची गायकीही या मूलभूत तत्त्वाला अपवाद नाही.

---

१ 'शोक' हे कुमारांच्या चिजांतील रसनाचे नाव आहे

प्रस्तुत चिजांकडे आणखी एका नजरेने पाहणे शक्य आहे. चिजा, या घराण्यातून त्या घराण्याकडे असा सतत प्रवास करीत असतात तरीही काही चिजा विशिष्ट घराण्याचाच छाप दर्शवितात. इतकेच नव्हे तर काही काही चिजा अमुकयाच घराण्यातील कलावंतांनी गाव्या असे वाटत असते. या दृष्टीने निरनिराळ्या घराण्यातील गायकांना या संग्रहातील काही काही चिजा खास आपल्याचकरिता बनविल्या आहेत असे वाटेल उदाहरणार्थ, कामोद रागातील 'ऐसन कैसन' ही चीज ग्वाल्हेर गायकांना स्वत:च्या घराण्यातील आहे असे वाटेल तर 'किराना' गायकांना 'सपनेमें मिलती' ही बसंत रागातील चीज त्यांच्याकरताच आहे असे दिसेल. तसेच जयपूर गायकांना गौरी बसंत मधील 'आज पेरीले' ही चीज खास स्वत:करता आहे असे पटेल सांगण्याचा मुद्दा असा की, निरनिराळ्या घराण्यातील गायकांनाही या संग्रहात खास त्यांच्या त्यांच्या करताच केलेल्या आहेत असे वाटणाऱ्या चिजा पुष्कळ सापडतील

कुमारांच्या जुन्या रागांतून आलेल्या बंदिशींविषयी मतभेद असू शकेल. आणि त्यातील काही स्वरप्रयोग हे विवादही असणार हे नमूद केले पाहिजे त्यातील काही ढोबळ गोष्टींचा निर्देश करणे युक्त होईल

| राग | पृष्ठ | | प्रकार | |
|---|---|---|---|---|
| भीमपलास | ७४ | सन सुर साधे | चीज | ध नि ध प |
| ,, | ७६ | जावा हू देमा | ,, | सा री म ग री सा |
| ,, | ७७ | दीं तन देरेना | तराणा | ग म प ध नि सा |
| पूरियाधनाश्री | ४३ | कहाँ चला हो रे | चीज | मध म ग री सा सा |
| ,, ,, | ,, | ,, | ,, | सा ग री सा |
| श्री | ४४ | सजा कहे जाय | ,, | री सा प ग ग री |
| छायानट | ६३ | नही आना तुम्हें | ,, | कोमल नी आवश्यक |
| बागेश्री | ६४ | टेसुल बन फुले | ,, | म म ग प |
| ,, | ,, | ,, | ,, | ग री नि सा |
| ,, | ६५ | पार नहीं हो | ,, | ग री प म |
| दरबारी कानडा | ७३ | सुंदर मुख तेरो | ,, | ध ध सा |

वरील सर्व गोष्टी कुमारांच्या प्रयोगशीलतेमधून जन्माला आलेल्या आहेत हे तर खरेच, पण त्यांहीपेक्षा त्यांच्या पाठीमागे काही तात्त्विक भूमिका आहे असे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. ती भूमिका अशी

जुने राग आज शेकडो वर्षे शेकडो गायकांकडून गायले गेल्यामुळे ज्या कोणा महाभागाला एखादा राग प्रथम सुचला तसाच तो आजही गायला जातो असे म्हणणे धाडसाचे होईल. त्यातही काही आगंतुक स्वर दाखल केले गेले असतील अगर काही स्वर गळाले असतील कदाचित त्या रागाचा संपूर्ण कायापालटही झाला असेल अर्थात ज्यांचा असा संपूर्ण कायापालट झाला असेल त्यांच्या बाबतीत काही करणे शक्य नसते. पण

त्याच्यात असे फेरबदल होऊनही मुख्य नकाशा कायम राहिला असेल त्यांच्या बाबतीत, त्या रागातल्या पुष्कळशा चिन्हांच्या आधाराने मनन होत गेले म्हणजे मूळ रचनाकाराच्या मनातली रचना काय असावी याचा अंदाज येऊ लागतो. म्हणजे तो राग आज जसा आहे याच्यापेक्षा तो त्यावेळी कसा असेल तसा तो मनामध्ये कायम होतो. अर्थातच त्या रागाचे हे नवीन स्वरूप त्याच्या आजच्या प्रचलित स्वरूपाशी मिळतेजुळते असणार नाही. त्या रागाची पुनर्विचाराने झालेली ही पुनर्रचना अथवा पुनर्घटना आहे असेच समजावयाला हवे. वगैरे.

कुमारांनी केलेले हे फेरबदल अगर त्या पाठीमागची तात्त्विक भूमिका सर्वांनाच मान्य होईल असे तेही समजत नाहीत. कदाचित बहुतेकांना ती मान्य होणार नाही असेच ते धरून चालले आहेत. एखादे वेळी कोणाला त्यातली भूमिका पटली तरी त्यामुळे कुमारांनी केलेलेच फेरबदल संभवनीय आहेत असेही ते कदाचित मानणार नाहीत याचीही कुमारांना जाणीव आहे तेव्हा जे कोणी गायक ही रागस्वरूपे कुमारांच्या पाठाप्रमाणे गातील त्यांनी ते कुमारप्रणीत पाठ आहेत एवढे ध्यानात घेऊन जरूर तर त्याचा तसा निर्देशही करावा अशी सूचना यावीशी वाटते. यातला मुख्य मुद्दा एवढाच की, जुन्या रागातले हे बदल अविवेकाने केलेले नसून त्यापाठीमागे काही तात्त्विक भूमिका आहे एवढे लक्षात घेणे अगत्याचे आहे.

ज्या नवनिर्मितीविषयी एवढे विवेचन केले ती अस्तित्वात कशी आली हे समजण्या-करता कुमारांच्या संगीताला सुरुवात कशी झाली, त्यांचा सांगीतिक प्रवास कसकसा झाला, त्या प्रवासात त्यांनी टप्पे कोणकोणते ओलांडले व एकंदरीत त्यांचा सांगीतिक विकास होऊन आताच्या परिणतावस्थेला ते कसे पोहोचले हे समजणे जरूर आहे. या दृष्टीने त्यांच्या सांगीतिक जीवनाचे थोडेफार अवलोकन केले तर ते उपकारक होईल, अशी आशा आहे.

कुमारांना मी १९३५ सालापासून पाहत व ऐकत आलो आणि त्यांच्या प्रथम दर्शनाची छाप आज सत्तावीस वर्षांनंतरही माझ्या मनावर तितकीच ताजी राहिली आहे माझे मित्र प्रा० बा० र० देवधर, कै० भेतीराम पै आणि मी स्वत त्या सालच्या मुंबईतील जिना हॉलमध्ये भरलेल्या संगीत परिषदेचे सूत्रधार होतो. अध्यक्ष संगीताला सर्वस्व• मानणारे त्यावेळच्या भरतपूर संस्थानचे महाराज होते आणि स्वागताध्यक्ष नामदार जयकर होते. परिषदेत अनेक गायकगायिकांच्या मैफली झाल्या आणि मुरलेल्या कलावंतांनी आपापल्या गुणवत्तेची शर्थ केली संगीताचा इतिहास बनविलेले महान गायक त्या परिषदेमध्ये मौजूद होते सर्व हॉल अगदी भरून गेला होता आणि तेथे उभे राहावयासही जागा नव्हती तो आजचा बाजार नव्हता ती मैफल होती आणि मैफलीच्या गुणोत्कर्षा मुळे तिच्या उत्साहाला सीमा नव्हती महाराजांच्या आणि जयकरांच्या अस्तित्वामुळे तिला वेगळीच प्रतिष्ठाही लाभली होती अशा वातावरणात खरा बारा वर्षांचा पण • दिसण्यात नऊ वर्षांचा बाल कुमार स्टेजवर येऊन बसला. आणि त्याने आपल्या आवाजाचे मोहिनीअस्त्र सभेवर टाकले. एका क्षणात ती सर्व सभा त्याच्या पकडीत आली. प्रत्येक

जागा आणि प्रत्येक हरकत उचलून घेतल्या जात होती सभेच्या उत्साहाला त्या वेळी उकळी आली होती आणि रसिकतेला उधाण आले होते स्वरन् स्वर खास आपल्याकरताच आहे अशी प्रत्येक श्रोत्याची तेथे खात्री होत होती कुमाराचे गायन थोडा वेळच झाले पण प्रत्येकाच्या चेहऱ्यावर विस्मय उमटला होता. हजर असलेल्या प्रत्येक कलावंताला व रसिकाला या मुलाचे कौतुक केलेच पाहिजे अशी ऊर्मी येत होती त्यामुळे तेथे कौतुकाचा पाऊस आणि बक्षिसाचा सडा पडत होता कोणी रोख पैसे दिले कोणी पदके दिली कोणी काही, कोणी काही, अशा कोपऱ्याकोपऱ्यातून उत्स्फूर्त देणग्या येत होत्या त्यात खाँसाहेब होते, बुवा होते व कलावती होत्या आणि हिराबाई बडोदेकरांनी आपले बक्षिस मलाच जाहीर करण्यास सांगितले होते प्रत्येकाला चिंता वाटत होती ती ही की या मुलाच्या असामान्य गुणाची जोपासना व विकास कोण करील ? अजाण कुमाराला मात्र यातले काहीच कळत नव्हते

कुमाराचे प्रथम दर्शन मला हे असे झाले. त्या वेळी त्याची ओळख अर्थातच नव्हता पण त्यानंतर ते थोड्याच दिवसात माझे मित्र प्रा० देवधर यांच्याकडेच शिकावयास राहिले देवधरांच व माझे मित्रत्वाचे संबंध त्यांच्या घरेच आधीपासून असल्यामुळे त्यांच निरोप व चिठ्ठ्याचपाट्या पोहोचविण्याचे काम कुमारच करीत असत शिवाय प्रा० देवधरही ज्या ज्या वेळी माझ्याकडे येत त्या त्या वेळी कुमारही त्यांच्या मागे मागे असत प्रा० देवधरांची शागीर्दी व कुमाराच्या विषयी वाटणारा लोभ यामुळे मीहि त्यांची आस्थेवाईकपणे चौकशी करी देवधरांचे कुमारावर पोटच्या मुलासारखे प्रेम, व कुमारानाही देवधरांच्या विषयी अपार आदर, यामुळे ही जोडी आली म्हणजे मला आनंद होई

नवनिर्मिती होण्याला अंगात काही विशेष गुण असावे लागतात वृत्तीचे स्वातन्त्र्य लागते स्वतंत्र प्रज्ञा व प्रतिभा लागते स्वभावच प्रयोगशील असावा लागतो आणि मुख्य म्हणजे बंडखोरपणा पण लागतो पुष्कळ वेळा या सर्व गोष्टी असूनही त्या फारशा प्रभावी नसल्या आणि त्यातून एखाद्या घराण्याची दीर्घकालपर्यंत तालमीची कडक शिस्त अंगात मुरली तर घराण्याच्या दडपणाखाली त्या चिरडूनही जाऊ शकतात अर्थात त्यातूनही एखादा अब्दुल करीमखाँ अगर अल्लादियाखाँ यांच्यासारखा दुर्दम्य स्वतंत्र वृत्तीचा कलावंत नवीन गायकी अथवा नवीन बंदिशी निर्माण करू शकतो पण हे फार क्वचित घडते घराण्याच्या बाबतीत त्यांची शिस्त, रीत, आचार, स्वतंत्र सौंदर्यप्रणाली याविषयी पुष्कळच नावाजण्यासारखे असले तरी त्याच्यामुळे कलावंताच्या व्यक्तिस्वातन्त्र्याला थोडा तरी पायबंद बसतो हे नाकारून चालणार नाही आणि अनेक नामवंत गायक गायिकांनी घरंदाज तालमी घेतल्या असल्या तरी घराण्याचे कडे आणि कोट ओलांडल्याखेरीज त्यांना त्यांच्या कलेचे आणि स्वतःच्या आत्म्याचे दर्शनही झाले नाही हेही खरे आहे अखेर • कला हा आत्म्याचाच शोध असतो पण आतापर्यंत संगीतातील कलावंताना घराण्याचे राजरस्ते संपविल्यानंतरच तो लागत असे

पण कुमाराचा सर्वच प्रवास या राजरस्त्यांनी न होता वेगळ्याच वाटेने झाला •मुळापासून वृत्ती स्वतंत्र व बंडखोर, त्यातून प्रज्ञा व प्रतिभाही थोर आणि स्वभाव निर्भय, शिवाय प्रा० देवधरांच्या तालमीमुळे ते कोणत्याही घराण्याच्या शिस्तीत असे अडकलेच

नाहीत कारण प्रा० देवधराचाच स्वभाव कुणाच्या शिस्तीत अडकून राहण्याचा नव्हता त्यामुळे वडजोर वृत्तीचे कुमार व स्वतंत्र वृत्तीचे देवधर या गुरुशिष्यांची जोडी ही समसमासंयोग अशी झाली. देवधरांच्या शागीर्दीत कुमार वयाच्या बाराव्या वर्षापासून ते तेविसाव्या वर्षापर्यंत म्हणजे जवळजवळ अकरा वर्षे होते पण ही गुरुशिष्यांची जोडी घराणेदार कर्मठ गुरुजी व अंधश्रद्ध शिष्य अशी झाली नाही आणि ती तशी न होणे हेच क्रमप्राप्त होते

कुमाराचे ते लहान व संस्कारक्षम वय आणि देवधराचा व्यासंग व चाकोरीबाहेरचा विचार यांचा हा संयोग विशेष फलदायी झाला देवधरांच्या निरनिराळ्या चळवळी व प्रयोग, त्यांची संगीतशाळा, त्यातील विद्यार्थ्यांच्या तालमी, त्यांची परदेशाची पर्यटणे व त्यातून उत्पन्न झालेला विशाल दृष्टिकोण, प्रो० रिंकी यांच्याजवळचे त्यांचे पाश्चात्य संगीताचे शिक्षण, संगीताबद्दलची सर्वसंग्राहक वृत्ती, निरनिराळ्या घराण्यातल्या खानदानी गायकांकडून निरनिराळ्या रागातील, निरनिराळ्या धनावटींच्या चिजा शिकून व नोटेशन करून त्यांचा केलेला संग्रह, प्रत्येक रागाची पद्धतशीर चिकित्सा व त्यावर चर्चा, त्यांच्या सभा व व्याख्याने वगैरे उद्योग या सर्व गोष्टी त्या काळात ऐन भरात होत्या देवधरांचे घर अथवा शाळा हीं गायकवादकांची उतारपेठच होती असा एखादा गायक नव्हता की त्याचे तेथे येणेजाणे नव्हते, आणि असा एखादा गायक, गायकी अथवा संगीताचे तत्त्व नव्हते की ज्याची तेथे चर्चा व शहानिशा होत नव्हती अनेक ख्यातनाम गायकही तेथे शाळेच्या मदतीकरता म्हणा अथवा प० विष्णु दिगंबर पुण्यतिथीनिमित्त म्हणा, अगर कोणा मोठ्या माणसाची भेट व्हावयाची म्हणून म्हणा आल्याखेरीज अथवा गायल्याखेरीज सहसा राहिले नाहीत इतक्या संगीतविषयक उलाढाली तेथे चालत मैफल मारणारे व जिंकणारे कलावंत म्हणून नाव मिळवण्याच्या खटपटीत देवधर फारसे पडलेच नाहीत पण अभ्यासू व संग्राहक वृत्ती आणि तपशिलवार चिकित्सा यांचे अपार धन देवधरांच्या जवळ होते निरनिराळी घराणी, त्यातील नामवंत गायक, त्यांच्या निरनिराळ्या गायकी देवधरांच्या सूक्ष्म नजरेतून अर्थातच सुटल्या नाहीत त्यांच्या सर्व गुणांची व सर्व दोषांची चर्चाही तेथे भरपूर होई देवधरांच्या जीवनात काहीही घडो, तेथे कुमार असावयाचेच महत्त्वाकांक्षी वृत्ती, संवेदनाशील मन, कोणत्याही कठीण आडवाटेत शिरावयाचे अंगात धाडस आणि संगीतविषयक निरनिराळ्या चर्चा व चिकित्सा यांचे नित्य श्रवण, यांनी कुमारांच्या बालवयात आणि तारुण्यात किती खोल परिणाम झाला असेल याची कल्पनाच करावी अमक्या गायकात अमका दोष आहे असे कळले की कुमारांना स्वतःशी निश्चय करावा की आपल्या गाण्यामध्ये हा दोष येऊ द्यावयाचा नाही. अमकीतमकी गोष्ट फारच चांगली पण तशीच अवघड आहे असे ठरले की कुमारांनी मनात प्रतिज्ञा करावी की मी ती करूनच दाखविणार अशा अशा तऱ्हेचे गाणे असावयाला पाहिजे अशी चर्चा झाली का कुमारांनी मनाशी गाठ बांधावी की आपण तसे गायचच, मग काय वाटेल ते होवो प्रत्येकाच्या गाण्यात देवधर काही ना काही तरी खामी काढायचेच आणि परिणामी कुमारांनी प्रतिज्ञा केली की या कुणासारखेही आपण गायच नाही व कोणाची नक्कल म्हणून करावयाची नाही

हा अर्थातच कुमाराच्या प्रवासाचा दुसरा टप्पा होता. म्हणून त्याच्या आधीचा म्हणजे प्रवासाच्या सुरवातीचा टप्पा पाहिला पाहिजे. कुमारांचे वडील कै० सिद्रामप्पा हे रावसाहेब अब्दुल करीमखाँचे खास प्रेमी होते. तसेच प्रसिद्ध पंचाक्षरीबुवा यांचे ते मित्र असून ते स्वत ही गात असत. पंचाक्षरीबुवांनाही ते कधी कधी विद्या सांगत. अर्थात संगीताचे वातावरण कुमाराच्या घरात त्याच्या जन्मापासूनच असे व त्यामुळे गायनाचे संस्कार तेव्हापासूनच त्यांच्यावर होऊ लागले. काही कळत नसले तरी अजाणताही ऐकण्याची क्रिया त्यांची सतत होतच होती. तोंड मात्र त्यांनी उघडले नव्हते. अर्थातच अशा तऱ्हेची संगीतानुकूल भूमी असल्यावर त्याला अङ्कुर फुटणे स्वाभाविकच होते. पण घरात मात्र कुणालाही या मुलाच्या मनावर काही संस्कार होत आहेत अगर रुजताहेत असा संशयसुद्धा आला नव्हता. आणि अशा स्थितीत एके दिवशी वयाच्या सहाव्या वर्षी, भिजलेली जमीन फाडून कोंब बाहेर पडावा त्याप्रमाणे, कुमार एकदम गाऊच लागले. त्या गाण्याने सर्वांना इतका चमत्कार वाटला की बोलायची सोय नाही. आणि पुढे कुमार जसजसे गाऊ लागले तसतसे त्यांच्या वडिलांनी गाणे सोडून दिले! कुमारांच्या गाण्याचा पहिला टप्पा अथवा खरे म्हणजे सुरवात ही अशी झाली.

हे सर्व गाणे अर्थातच अनुकरणात्मक स्वरूपाचे होते आणि देवधरांच्याकडे येईपर्यंत व त्यानंतरही काही वर्षे ते तसेच राहिले. त्यांची अनुकरणाची सुरवात वझेबुवांच्या एका ग्रामोफोन रेकॉर्डने झाली आणि वडिलांना व घरातल्या इतर मंडळींना वयाच्या सहाव्या वर्षी जो आश्चर्याचा धक्का बसला तो याच रेकॉर्डच्या सहीसही नकलेमुळे पुढे पुढे त्यांनी इतरही ख्यातनाम गायकांच्या नकला करण्यास सुरवात केली व प्रत्येकाची नक्कल ते इतकी हुबेहूब करीत की ती 'नक्कल' नसून 'असल'च आहे असे वाटे. यात सर्व नामवंत गायक आले होते. खाँसाहेब अब्दुल करीमखाँ, खाँसाहेब फैयाजखाँ, वझेबुवा, मास्टर कृष्णराव, पंडित ओंकारनाथ, रामभाऊ सवाई गंधर्व, मल्लिकार्जुन मन्सूर, केसरबाई केरकर वगैरेंच्या नकला त्या त्या गायकांनी ऐकून कुमारला आशीर्वादहि दिलेले आहेत खाँसाहेब अब्दुल करीमखाँ व रामभाऊ सवाई गंधर्व यांची एकापाठीमागून एक अशीही नक्कल करून या गुरुशिष्यातला भेद ते स्पष्टपणे दाखवीत. देवधरांनी एकदा केसरबाईंच्याजवळ कुमाराची स्तुति केली त्या वेळी ते काहीतरीच बोलत आहेत असे केसरबाईंना वाटले. कुमाराना राग आला व त्या क्षणीच त्यांनी त्यांच्या 'सुखकर आयी' या रेकॉर्डची नक्कल त्यांच्यासमोरच करून दाखवून त्यांना स्तिमित केले. फैयाजखाँही अलाहाबादला कुमारांनी केलेली स्वत ची नक्कल ऐकून असेच स्तिमित झाले होते. एकदा सावंतवाडीकर महाराजांनी कुमाराच्या करामतीवर अविश्वास दाखविला व "मी एक रेकॉर्ड ऐकवितो तसे गाऊन दाखव पाहू" असे ते त्यांना म्हणाले. त्यांनी काढलेली रेकॉर्ड म० रहिमतखाँसाहेबांची होती. पण ती ऐकल्याबरोबर कुमारांनी तत्काल तसे गाऊन दाखविले आणि महाराज थक्क झाले मी प्रथम ऐकलेल्या जिना हॉलमधील गाण्यात खाँसाहेब अब्दुलकरीमखाँ यांची 'जमुनाके तीर' ही रेकॉर्ड अगदी हुबेहूब नक्कलच घेतली होती

कुमारांच्या नकलांविषयीच्या सांगण्यासारखा विशेष असा होता की ते नक्कल करीत असे म्हणण्यापेक्षा त्या त्या गायकाची गायकीच ते गात असत असे म्हणणे बरोबर होईल स्वर लावण्याची पद्धत, आलापीची रीत, तानपलट्याच्या जाती, लयीचे न्यास, बोलतानांची तऱ्हा ही सर्व ज्याची त्याचीच असून त्या त्या कलावंताची कलाच ते जणू काही पेश करीत असत त्यात नक्कलेतला मिस्किलपणा व उपहास किंचितही नव्हता. त्या त्या गायकावर त्यांची श्रद्धा होती व त्या श्रद्धेच्या पोटीच हे सर्व अनुकरण होत होते ती त्या त्या कलावंताची तीन मिनिटांची रेकॉर्ड नव्हती ते ते त्यांचे संपूर्ण गायनच होते

इतके सर्व जरी झाले तरी त्या वेळी गायनाची 'समज' अशी त्यांना झालीच नव्हती कुणीही सांगावे, 'अमक्या अमक्याची नक्कल कर' की ती झाली मुळ गाण्याला काही राग म्हणून असतो, त्याला वादी संवादी आणि संवादी असतात, त्यात काही वर्ज्यावर्ज्य असतात, काही नियम असतात, काही कायदे असतात याचे काहीही ज्ञान या अजाण कुमाराला नव्हते आणि तरीही ते गाणे म्हणून पद्धतशीर व रागनियमांना धरून होत असे पण काही झाले तरी हा सर्व प्रकार यांत्रिक होता

पुढे पुढे देवधरांच्या शिकवणीमुळे आणि सहवासामुळे हे सर्व पालटत चालले आणि जसजशी समज येत चालली तसतसा गाण्यातला हुकमीपणा कमी कमी होत चालला इतकेच नव्हे तर उलट, प्रत्येक गाण्याच्या वेळी भीती व संकोच यांचेच दडपण त्यांच्यावर असे माझा स्वर बरोबर लागतो आहे की नाही, राग मी बरोबर गातो आहे की नाही, त्याचे वादी-संवादी बरोबर राहतात की नाही, त्याचे नियम आणि कायदे बरोबर पाळले जातात की नाही, याची सारखी धास्ती त्यांना वाटत असे देवधरांची चर्चा ऐकून याच वेळी कोणाची नक्कल म्हणून या जन्मात पुन्हा करावयाची नाही व कोणाही सारखे गायचे नाही अशी तर मनातली प्रतिज्ञा, आणि आता तर स्वरच बरोबर लागतो की नाही याची मनात भीति अशा वेळी मनातली व्यथा तीव्र होई आणि एका वेळेला तर या व्यथेला असे काही अग्र आले की त्या वेळी पराभूतपणा, निराशा व वैफल्य यांच्या जाणिवेमुळे रस्त्यावरच्या पॅवेल कंपनीखाली १९४१ साली एके सध्याकाळी रडू कोसळल्याची हकिगत, आपल्या जीवनातली एक महत्त्वाची घटना म्हणून, कुमार सांगतात प्रस्तुत लेखकाच्या दृष्टीने ती प्रवासातला एक अपरिहार्य असा टप्पा आहे तो कुणालाही चुकत नाही यातली महत्त्वाची गोष्ट अशी की, कुमारांसारख्या जन्मातरीच गुण घेऊनच जगात प्रवेश करणाऱ्या कलावंतालासुद्धा प्रवासातला हा टप्पा चुकला नाही मग इतरांची गोष्टच कशाला ?

याच अवस्थेमध्ये कुमारांनी १९४१ पासून १९४७ पर्यंत अशी सहा वर्षे काढली ! बाहेर त्यांची गाणी व मैफली होतच होत्या व श्रोतेही भरपूर वाहवा देत होते त्यांची कीर्तीही दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणात होती आणि इतर तरुण गायकांवर त्यांची छाप अधिकाधिक पडत चालली होती पैसेही भरपूर मिळत होते पण ही वाढती लोकप्रियता मिळत होती तरी अंतरीची चिंता उत्तरोत्तर अधिक प्रमाणात पण जागतीच होती स्वत ला तर कोणासारखे गायचे नाही व नवीन काही करता येत नाही अशा स्थितीत फिरत फिरत

ते देवासला त्याचे गायन मित्र श्री० कृष्णराव मुजुमदार यांचेकडे सन १९४७च्या सुमारास येऊन राहिले. "गाणे ऐकवण्यावरताच खास मी तुमच्याकडे आलो" असे मुजुमदारांना सागण्याइतका उल्हास मात्र त्यांना त्यावेळी वाटत होता. सकाळी साडेआठ नऊ वाजता गाण्याला सुरवात व्हावयाची व ते गाणे साडेबारा एकपर्यंत चालावयाचे. पुन्हा विश्रांती घेतल्यानतर चार-साडेचारला सुरू व्हावयाचे ते आठ-साडेआठपर्यंत आणि रात्री जेवण झाल्यावर पुन्हाः बसावयाचे ते रात्री बारा एक वाजेपर्यंत, असे सतत दहा दिवसपर्यंत • त्यानी मुजुमदारांना गाणे ऐकविले आणि एके रात्री भीमपलास राग इतका जमला की, कुमारांना स्वत लाच एकदम साक्षात्कार झाल्या की "मला गाणे आले!" सहा वर्षांची निराशा व अंधकार यांनतरचा हा प्रकाश होता. त्यामुळे त्यांच्या संबंध जीवनातच आनद पसरला. पुढील जीवनात आता निराशा नाही व अधार नाही. आता फक्त आनंद आणि प्रकाशच आहे अशी ग्वाही त्यांना या गाण्यामुळे मिळाली. "त्या रात्री मी व मुजुमदार पहाटे चार वाजेपर्यंत त्या उल्हासातच बोलत राहिले होतो" अशी आठवण कुमार सागतात.

• याच सुमारास कुमारी भानुमती कस यांच्याशी त्याचा विवाह झाला. भानुमती 'कुमाराच्याकडेच गाणे शिकणार' या जिद्दीने आल्या होत्या. गाणे शिकता शिकता प्रेमही जमले आणि लवकरच त्याचा विवाह झाला. अर्थातच या आनंदाला आणि उल्हासाला भरती आली. भानुमती स्वतः एक कर्तबगार गायिका होत्या, सुविद्य होत्या, एम्० ए० झाल्या होत्या व डॉक्टरेटही घेण्याचा त्यांचा विचार होता. इतर गायिकांच्या मानाने त्याचा आवाजही पुष्कळच रुंद आणि झारदार होता. कुमाराची बिकट गायकीही त्यानी पुढे आत्मसात केली होती. पण स्वतन्त्र गायला बसल्या म्हणजे कुमाराच्या गायकीतल्या बिकटपणाला त्या छाट देत असत आणि त्याचीच गायकी त्या सुबोध व प्रसन्न करून माडीत असत. कुमाराच्या मागे तबोरा धरून त्या साथीला बसत त्या वेळी मैफलीच्या प्रसन्नतेत आणखीच भर पडे.

पण विधिघटना काही वेगळी होती. ऐन तारुण्य, गाणे हस्तगत झाल्याचा साक्षात्कार आणि खर्जाबरोबर आपोआप वाजणाऱ्या गंधाराप्रमाणे गायकीमध्येही साथ देणाऱ्या सुशील व कर्तबगार सहचरीचा लाभ, या सर्व गोष्टीत मिठाचा खडा पडला. आणि कुमार •क्षयासारख्या दुर्धर अशा शारीरिक व्याधीने पछाडले गेले. शरीरस्वास्थ्यासाठी त्याना मग मुंबईहून मध्यप्रदेशातील देवास येथे स्थानातर करावे लागले व तेव्हापासून आज सतरावर वर्षे ते तेथेच स्थायिक होऊन राहिले आहेत. त्यातली पहिली पाच वर्षे, म्हणजे १९४७ ते १९५२ पर्यंत, ते जवळजवळ अथरुणावरच पडून होते

हे आजारीपण म्हणजे जीवावरचेच सकट होते, पण कुमाराची इच्छाशक्ती त्यालाही पुरून उरणारी होती. "He was never as great as in a disaster" असे नेपोलियनविषयी एक वचन आहे, त्याचीच येथे प्रचीती आली. अथरुणावर पाच वर्षे निष्क्रिय अशा स्थितीत पडून असतानाही "आता मला गाणे आले आहे" हा उल्हास होता आणि या जाणिवेमुळेच हे दुखणे सह्य झाले असे कुमार सागतात या पाच वर्षांत • कुमाराना तबोरा काढून गावयाचे नाही असा डॉक्टरी आदेश होता व तो त्यानी अक्षरश

घावला. पण कदाचित त्यामुळेच त्यांचे मनही चिंतनशील झाले. भानुमतीनाही याच सुमाराला देवासच्या गर्ल्स हायस्कूलमध्ये शिक्षिकेची नोकरी लागली व त्या कामावर गेल्या म्हणजे कुमार घरी अगदीच एकाकी पडावयाचे मन इतके व्यग्र असताना हा एकांतवास एरवी भीषण झाला असता. पण कानी आल्याचा मनाला झालेला आनंद याही अवस्थेत त्यांना प्रकाशाचा किरण दाखवीत होता आणि त्यामुळे हे आजारीपणही त्यांना कामी लावता आले. इतकेच नव्हे तर त्याचमुळे त्यांना संगीतात खोलवर बुडी घेऊन त्याच्या तळाशीही जाऊन भिडता आले आणि एरवी जीवघेणी ठरणारी ही व्याधी संगीताला उपकारक बनली.

चोवीस तास अंथरुणावर पडल्यापडल्या अवतीभोवतीच्या खेड्यातल्या लोकगीतांचे स्वर त्यांच्या कानावर पडू लागले आणि त्या रांगड्या लोकगीतांकडे आणि विशेषत त्यांच्या धुनांकडे त्यांचे अधिकाधिक लक्ष जाऊ लागले आणि त्यातून एका नवीन विश्वाचे त्यांना दर्शन झाले.

कानावर पडणारे प्रत्येक लोकगीत अगदी लक्षपूर्वक ऐकावयाचे, मनातल्या मनात साठवून ठेवावयाचे व पडल्यापडल्या शरीराला ताण न देता हलक्या आवाजात गुणगुणून त्यावर सतत चिंतन करावयाचे असा त्यांचा उद्योग सुरू झाला. देवासच्या भूमीमध्येच काय जादू आहे कोण जाणे! काही वर्षांपूर्वी मी तेथे गेलो असताना मलाही तेथल्या मातीत संगीताचा गंध आला होता आणि ही भूमीच आपल्या कोल्हापूर, मिरज या इला-ख्याप्रमाणे खास संगीताची आहे अशी मनोमन प्रतीती झाली होती कुमारांचे देवासला स्थानांतर होणे हाही एक योगायोगच होता. आणि याच भूमीमध्ये त्यांच्या संगीतकलेला लोकगीतांचे आणखी एक कलम बांधले गेले

लोकगीत हे संगीताचे मूळ आहे असे म्हटले जाते त्यात फार मोठा अर्थ आहे असे मला वाटते. लोकगीत हे आपल्या रागसंगीताचे आधारभूत तत्त्व आहे निरनिराळ्या लोकगीतांच्या निरनिराळ्या चालींतूनच नवीन नवीन राग जन्माला येत असतात. 'आहिरी', 'माळवी', 'भटियारी', 'मुल्तानी', 'सोरट', 'तिहारी' वगैरे रागरूपे त्या त्या प्रांतातील म्हणजे आहीर, माळवा, बंगाल, सिंध, पंजाब, सौराष्ट्र, तिहार वगैरे प्रांतातील मूळ लोकगीतेच होत. रागरूपे मूर्छनेने, वादी-संवादी आणि वर्ज्यावर्ज्य तत्त्वाने गायकांनी बांधीतच बनविली. पण ते सर्व पुढे, संगीताचा विकास होऊ लागला तेव्हा. पण काही झाले तरी रागांचे जन्मस्थान अगर बीज या लोकगीतातच आढळते. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रदेशांतील लोकगीते म्हणजे रागरूपांची खरोखर खाणच आहे. पण आश्चर्याची गोष्ट अशी की ज्या जागेवरून गायकांनी प्रस्थान ठेवले तिच्याकडे वळून मागे पाहण्याची बुद्धी गायकांना सहसा होत नाही. लोकगीतांच्या वाङ्मयीन अर्थाकडे अर्थातच पुष्कळच लोकांचे लक्ष गेले आणि अनेक भाषांतील अनेक अभ्यासकांनी गावोगावी जाऊन ती गोळा केली व त्यांचे संग्रहही प्रसिद्ध केले. तसेच अनेकांनी त्यावर मोठमोठे प्रबंध लिहिले पण हे सर्व झाले ते या गीतांच्या वाङ्मयीन अर्थाविषयी. पण ज्या भांड्यातून म्हणजे ज्या चालींतून अथवा स्वरावलींतून हा अर्थ वाहविला गेला त्यांचा अभ्यास मात्र झाला नाही या लोकगीतांच्या सर्व चाली ऐकून त्या त्यांच्या गीतांसकट गोळा करून, गुणगुणून, नोटेशन करून, लिहून, त्यांचा रागरूपांच्या दृष्टीने अभ्यास सहसा

कोणी करत नाही. पण आजारीपणामुळे लाभलेल्या निवांतपणामुळे कुमारांचे संगीताच्या या गंगोत्रीकडे लक्ष गेले आणि त्यांच्या संगीतवेलीला आणखी एक अंकुर फुटला. या जोमदार अंकुराचीच पुढे वाढ झाली आणि त्यामुळे कुमारांचे सांगीतिक उद्यानच फुलून गेले. त्यात त्यांना नवीन राग सापडले, नवीन बंदिशी करण्याची स्फूर्ति झाली आणि त्यांचे एकूण संगीतमय जीवनही बहरून समृद्ध झाले.

कुमारांच्या या लोकगीतांच्या अभ्यासाविषयी थोडी आणखी माहिती देणे जरूर आहे. *खेडुतांचे या गीतांचे गायन चालू असताना त्यात गाभीत तर होता येत नाही,* आणि गाणी, त्यांच्या चाली व शब्द तर जिवाचे कान करून त्यात साठवून ठेवावयाच्या. तेव्हा थोडे दूरच, पण स्वच्छ ऐकू येईल इतक्या अंतरात आणि खेडुतांच्या लक्षात न येईल अशा बेतात उभे राहावयाचे. तशात चोणाची नजर गेली तर हा मनुष्य कसली टेहळणी करतो आहे असा त्यांना संशय यावयाचा. आणि एकदोरदाच एकदा त्यांना "हा चोरच आहे" असे समजून ही खेडूत मंडळी मारावयालाही धावली होती. "तुमच्या फक्त चाली ऐकण्याकरिता मी उभा राहिलो आहे" हे सांगूनही समजूत पटणे मुश्किल. कशीबशी सुटका झाली हेच नशीब.

पण अशा विचित्र अनुभवातूनही त्यांनी या लोकगीतांचा संग्रह, त्यांच्या चालींसकट व कवितेसकट विपुल केला आहे. (आणि ऑक्टोबर १९६१ मध्ये बाळंतपणात निधन पाव लेल्या भानुताईंचे त्यात त्यांना अपरिमित साहाय्य झाले हे नमूद केले पाहिजे.) कुमारांनी सो नोटेशनही करून, लिहून ठेवला आहे. आणि खाजगी मित्रांच्या समोर फक्त लोक गीतांच्याच अविस्मरणीय अशा त्रियेर मैफलीही केल्या आहेत, ज्या प्रस्तुत लेखकानेही काही ऐकल्या आहेत. हा त्यांचा संग्रह जवळजवळ दोन-अडीचशे गीतांचा झाला आहे. जेव्हा केव्हा त्याची हस्तरेषा उगवून तो प्रसिद्ध होईल तेव्हा एक अमूल्य ठेवा म्हणून तो स्वागताईच ठरेल. आणि त्यात चालींच्या दृष्टीने एक गुप्त धनच मिळाल्याचा आनंद होईल यात शंका नाही.

असो. सांगण्याचा हेतु असा की, इतक्या प्रथितयश गायकाने लोकगीतात इतक्या खोलदर अवगाहन करावे, त्याकरता इतकी वर्षे वाहून घ्यावे, ही घटनाच असाधारण आहे. आणि कुमार तरी या अभ्यासात इतकी वर्षे गुतून गेले, रमून गेले ते त्यांच्या वेगवेगळ्या चालींतच काही हाताशी लागते म्हणूनच नव्हे का? आणि मग प्रश्न उभा पडतो की, फक्त माळवा प्रांतातच आणि देवासच्या आसपासच इतकी गीते आणि इतक्या चाली सापडल्या तर इतर प्रांतात याहीपेक्षा वेगळ्या वळणाच्या, वेगळ्या ठसक्यांच्या, भिन्न तालाघातांच्या आणि निराळ्याच ढंगांच्या चाली आढळणार नाहीत का? वेगळ्यावेगळ्या प्रदेशातील चिकित्सक गायक जेव्हा आपापल्या प्रांतातील लोकगीतांचा अभ्यास करतील तेव्हाच हे गुप्तधन हाती लागण्याचा संभव. नाही तर ते आपोआप नाहीसे होत चाललेच आहे आणि त्याबद्दल खंत बाळगणाराही कोणी सापडत नाही. ध्वनिमुद्रित करून तरी ते कोणी ठेवावयास हवे. पण त्याचे महत्त्व सांगावयाचे कोणाला व ऐकणार तरी कोण? प्रांतप्रांतातून संगीत ॲकेडेमी स्थापन झाल्या आहेत. त्यांनी तरी हे कार्य मनावर घ्यावे ना? पण *त्यांचेही नाव दिसत नाही. आणि महाराष्ट्राची तर ॲकेडमीही अजून उगवावयाची आहे!*

तात्पर्य असे की, कुमारांना नवीन रागरूपे सापडली ती या लोकगीतांच्या संशोधनातून. लोकगीते सहसा संपूर्ण सप्तकाची असत नाहीत. पण पाव, अर्धा सप्तकाचीच जी काही आढळतील त्यावर चिंतन होत गेले म्हणजे बाकीचे स्वर कसे घालावे हे आपोआपच सुचते. त्यांना रंजकता आली की नाही, रागत्व साधले की नाही, मैफलीत गायलाला त्याला स्वभावतःच अवसर लाभला आहे किंवा नाही वगैरे गोष्टी या नंतरच्या असतात. मैफलीच्या निकषावर पासल्या गेल्या म्हणजे त्यांचे वादी-संवादी, वर्ज्यावर्ज्य व खास कायदे आपोआप उलगडू लागतात.

कुमारांच्या या संग्रहातील नव्या रागांची जन्मकथा ही अशी आहे. ते राग घडवायला म्हणून बसून 'केलेले' नाहीत. ते 'झालेले', आपोआप स्फुरलेले आहेत.

निसर्गाच्या सान्निध्यातला निवांतपणा, असाधारण सांगीतिकता, विलक्षण संवेदनाशीलता व प्रयोगशील मन यातूनच हे सर्व नवीन राग जन्माला आले हे खरे. पण त्याच वेळी त्यांचे जुन्या रागांवरही चिंतन व मनन सतत चालू असे. अशा मननातून दहा-बारा मिश्र राग व नव्याजुन्या रागांतील सर्व बंदिशी याच पद्धतीने स्फुरल्या आहेत.

आपण कुमारांच्या गायकीच्या विकासाचे टप्पे पाहत होतो. त्या दृष्टीने आणखी एकदोन टप्पे सांगता येण्यासारखे आहेत. नवीन बंदिशींच्या व नवीन रागांच्या निर्मितीचे काम गेली चौदापंधरा वर्षे सतत, जवळजवळ १९५० सालापासून, चालू असताही त्यांची विकसनशील गायकी अर्थातच स्वस्थ बसली नव्हती. तिचाही प्रवास आस्ते आस्ते होतच होता. आणि या विकासमार्गातील आणखी एक टप्पा म्हणजे गायकीच्या कल्पनेचाच विस्तार होत जाणे. कुमारांच्या सांगीतिक जीवनामध्ये माझ्या समजुतीप्रमाणे असाही एक कालखंड आला होता की श्रोत्यांच्या डोळ्यात अश्रू न आणणारे ते गाणेच नव्हे असे त्यांना वाटत असावे. हे १९५३-५४ साल असावे. त्यावेळी कुमारांचे वय २९-३०च होते. त्यांचा सर्व उद्योग त्या वेळी याच दिशेने चालला होता असे दिसते. दहापाच गायक श्रोत्यांच्या मैफलीत त्यांचा हा प्रयोग सफल झालेला लेखकाने अनेक वेळा पाहिलेला आहे. कारण त्या अश्रू आलेल्या श्रोत्यांमध्ये तोही अनेक वेळा हजर होता आणि त्या वेळी त्यांच्या स्वत:च्या वृत्तीही उचंबळून निघाल्याच्या त्याला अविस्मरणीय आठवणीही आहेत. अशी मैफल चालू असेपर्यंत, एक उन्मनी अवस्था निर्माण करणारा अनुभव मनामध्ये साठवून ठेवताना, सर्व ठीक होते. पण त्यानंतर लगेच असा प्रश्न पडे की, सर्व संगीत अथवा एखाद्याची सर्वच स्वरधारणा आणि मांडणी या एकाच हेतूने प्रेरित असावी काय? एकाच प्रकारची भाववृत्ती जागृत व्हावी अथवा करावी इतके संकुचित होत संगीताने अथवा गायकाने स्वत:साठी आखून घ्यावे काय? तसे असेल तर वेगवेगळ्या रागांच्या भाववृत्ती वेगळ्या असतात असे म्हटले जाते, त्याची वाट काय? मग या वृत्तींना पोषक नसलेले राग टाकूनच द्यायचे काय? आणि हा बांध घेतूनही गायकाने बाहेर यायचा नसतो काय? असे अनेक विचार मनामध्ये येत असत. पण पुढे कुमार स्वत:च या खोड्यातून बाहेर पडले. आणि त्याही बंधनातून स्वत:ला मुक्त करून घेऊन आपल्या गायकीच्या कल्पनेचाच त्यांनी विस्तार केला. ती आता एकाच बांधाच्या आत उचलली राहिली नाही.

आणि आता सांगावयाचा शेवटचा टप्पा राहिला. कुमारांचे गाणे त्यांच्या लहान वयापासून मी ऐकत आलो. त्या दृष्टीने एक गोष्ट अलीकडेअलीकडेपर्यंत मनाला खटकत होती. ती म्हणजे त्यांच्या मांडणीतला स्वैरपणा अथवा कोठल्याही विशिष्ट रीतीचा, शिस्तीचा अथवा प्रणालीचा पद्धतशीर अभाव. कलावंत चतुरस्र असतो व मोठा कलावंत मोठा चतुरस्र असतो, असावा लागतो, हे सर्व खरे. प्रथम प्रथम या चतुरस्रतेला, म्हणजे कलावंत करीत असलेल्या नवीन गोष्टींना नवीन श्रोत्यांकडून त्या 'नवीन' म्हणूनच हुंकार मिळून जातो. पण पुढल्यापरत्वे भागत नाही. कारण त्या नवीनाच्या स्वीकारातूनही काही एकसंध, एकजिनसी अशी आकृती निर्माण व्हावी लागते, आणि ती होण्याकरता त्या मांडणीला काही क्रम, काही नीत, काही शिस्त यावी लागते. स्वरवर्णांचे धागे एकमेकांमध्ये योजनेने गुंफविले जावे लागतात. ती मांडणी तालाचे कोठलेही एक आवर्तन घेतले तरी त्यातही दिसायलास हवी, आणि ती आवर्तनेही पुन्हा एकमेकांमध्ये अशाच योजनेने, चढत्या भाजणीने, गुंतवावयास हवीत. वेगवेगळ्या वासाची, आकारांची आणि कमीअधिक नजाकतीची रंगीबेरंगी फुले नुसतीच गोळा करून त्यांची रास मांडणे वेगळे व त्यातून विशिष्ट तरकिबीच्या फुलांचा एकसंध गुलदस्त करणे वेगळे. फुलांच्या नुसत्या राशीलाही एक प्रकारचा आकार, रंग व वास असतोच. पण भरदार गुच्छगुच्छाची शोभा त्याला येत नाही. नवीनाचे ऐकणे एकेका फुलाला एकएकटे हुंगून त्याचाच आस्वाद घेण्यासारखे असते. पण साकल्याने ऐकणे हा गुण येण्याकरता श्रोताही अनुभवीच असावा लागतो. या सर्व गोष्टी अर्थातच गरावलेल्या रसिक अथवा गायक श्रोत्यांतील मैफलींच्या अनुभवामुळेच गायकाला साध्य होतात. एखाद्या राजरस्त्याने जाऊन, म्हणजे कोणत्या तरी घराण्याची खास तालीम घेतल्यामुळेही, त्या अर्थातच साध्य होतात, आणि मग त्याचा विकासही होत जातो.

पण कुमारांचा सर्वच प्रवास या धोपटमार्गाने न झाल्यामुळे हा मैफलींच्या अनुभवाचाच संचय जसाजसा जमा होत गेला तसतसा त्यांच्या मनातल्या एकसंध आकारयोजनेचाही विकास होत गेला. त्यांच्या प्रवासातला हा विकास याच्या आधीही, आस्ते आस्ते होतच होता. पण आकारतत्त्वाची जाणीव त्यांना १९५७ अखेर झाली असावी अशी माझी समजूत आहे. तोपर्यंत मी त्यांच्या अनेक लोभनीय गुणांमुळे आकृष्ट झालो असलो तरी त्यांच्या गायकीचा मनातून तरी टीकाकारच राहिलो होतो. पण सत्तावन सालच्या डिसेंबरमधील पुण्यातल्या त्यांच्या एका बैठकीने माझे बरेचसे मतपरिवर्तन झाले. शेजारीच बसलेल्या प्रा० मंगरूळकरांना मी विचारले, "आजपर्यंत आपण जी टीका करीत होतो तशी आता कराल का?" आणि त्यांनीही "नाही" म्हणून या मताला दुजोरा दिल्याचे आठवते. या संदर्भात मला एक पुण्याचीच यापूर्वीची आठवण सांगण्यासारखी वाटते. त्यावेळी कुमारांच्या गाण्याच्या वेळी माझ्या शेजारी एक मान्यवर ज्येष्ठ वादनकार बसले होते. गाणे अर्थातच रंगले होते व वाहवाही भरपूर येत होती. पण ते वडिलधारे कलावंत माझ्या कानात तेवढ्यात कुजबुजले, "हे सर्व ठीक आहे, पण वामनराव, कुमारचे घराणे कोठले?" त्यांच्या मनातला अभिप्राय मी ओळखला. कुमारांच्या गायकीला अजून एकजिनसी घाट आला नाही असेच त्यांना सुचवावयाचे होते.

आज त्याचे मन काय आहे ते मला माहीत नाही पण ते त्यावेळच्यासारखे नसावे असाच माझा अंदाज आहे. सांगण्याचा मुद्दा असा की मला स्वत: ला हा घाट सत्तावन सालापासून म्हणजे कुमारांच्या तेहेतिसाव्या वर्षापासूनच प्रतीत व्हायला लागला. यावर कुमारांचे स्पष्टीकरण असे की प्रत्येक बैठकीमध्ये मी काही तरी नवीन प्रयोग करण्याच्या उद्योगात असतो आणि आजही तसाच आहे आणि त्याचमुळे तुम्हाला तसे वाटत आले याचा अर्थ, ते आजही विकसनशील आहेत असाच केला पाहिजे आकृतितत्त्वाचा परिपोष त्यांच्या हातून सतत होत राहावा अशी कोणीही इच्छा करील

कुमारांनी नवी गायकीही निर्माण केली असे मागूर्वी सांगितले आणि प्रस्तुत समष्टी त्यांच्या नवनिर्मितीचच फळ आहे 'गायकी' ही स्वरलेखांकित होऊच शकत नाही, तेव्हा ती या प्रयत्नाही पुरेशी समजणार नाही तरी पण कुमारांच्या कृती लक्षात घेताना त्यांच्या गायकीचा विशेष संदर्भही लक्षात घेतल्याखेरीज त्यातली 'बात' कळणार नाही. म्हणून त्यांच्या गायकीची थोडीफार चिकित्सा करणेही अपरिहार्य आहे आणि मग कुमारांनी नवीन गायकी निर्माण केली म्हणजे काय केले, ही नवीन गायकी गायकीच्या जुन्या सर्व प्रकारांपेक्षा वेगळी कशी आणि कोठे आहे, तिचे स्वागत गायकांकडून आणि श्रोत्यांकडून कसे झाले, घरंदाज गायकांची त्याबाबत प्रतिक्रिया काय आहे, वगैरे प्रश्न या संदर्भात ओघानेच उद्भवतात

कोणतीही नवीन गोष्ट निर्माण होते तेव्हा ती जुन्या गोष्टींचा धागा घेऊनच तयार होत असते नवीन गोष्ट अगदी जमिनीशी संबंधच नसल्यासारखी आभाळातून ऐनवेळी पडत नाही स्वीकार असो अथवा इन्कार असो, परंपरा ही कुठल्या ना कुठल्या प्रमाणात तरी असायचीच या दृष्टीने नवीन म्हणतामहणतादेखील जुन्या गोष्टींची सोयरीक कुमारांनी अगदीच झुगारून दिलेली नाही इतकेच नव्हे तर बहुश्रुत श्रोत्याला तिचे धागेदोरे पुसटपणे का होईना, लक्षात आल्यावाचून राहत नाहीत हेरवाची स्वत ची पिढी, म्हणजे वयाच्या पन्नासपंचावन्नवरची आजची पिढी, या अर्थाने बहुश्रुत आहे असे म्हटले पाहिजे कारण तिने आपल्या हयातीत, गेल्या पाचपन्नास वर्षांचा इतिहास घडविलेल्या महनीय कलावंतांना ऐकलेले आहे त्यात अल्लादियाखाँ, रहिमतखाँ, फैयाजखाँ, अब्दुल करीमखाँ, मंजीखाँ वगैरे खाँसाहेब आणि बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, भास्करबुवा बखले, वझेबुवा, सवाई गंधर्व इत्यादी बुवा प्रामुख्याने मोडतात यांपैकी बरेचसे कुमारांनी आपल्या लहानपणी ऐकलेले आहेत आणि यांपैकी बऱ्याच जणांना वारसदार ते ऐकत आले आहेत त्या सर्वांचे अनुकरणही त्यांच्या गायकीत कमीअधिक प्रमाणात दिसतात इतकेच नव्हे तर लहानपणी बहुतेकांच्या नकला ते सहीसही करत असत अशी हकिगत मागूर्वीच आली आहे पुढे पुढे नकला करण्याचे त्यांनी सोडून दिले तरी लहानपणी झालेले संस्कार मात्र कायमच राहिले. आणि हे जे संस्कार त्यांच्या मनात घर करून राहिले ते त्या त्या गायकीच्या मर्मांचे मंथन करूनच देवधरांची चर्चा नित्य यानंतर घडतच होती, आणि त्यात अनायासेच समर्थ चिंतन असेच अर्थातच भाग होता प्रत्येक घराण्याच्या गायकीमध्ये दडलेला आवडणारा चांगला भाग पुढचाच होता आणि स्वतःला पटलेला चांगला भाग ते विशद करूनही सांगत

असत. अर्थातच या सर्व गायकींचे आणि निरनिराळ्या गायनाच्या वैयक्तिक बरेच सार कलात सामावलेले आहे ते कुमारांना सहजासहजी समजत गेले त्यामुळे त्यांच्या गायकीत प्रत्येक गायकीचा 'साराश' सहजासहजी ग्रथित झाला आणि आजही त्यांचे गायन ऐकताना माझ्या पिढीच्या श्रोत्यांना तरी त्या त्या प्रकारच्या आलापीचा, बोलतानाचा आणि तानक्रियांचा पूर्वसूरींशी असलेला लागाबांधा थोडाफार तरी कळतो कुमारांच्या गाण्यात, वेगवेगळ्या प्रसंगी मजीखाँ, फैयाजखाँ, रहिमतखाँ, रजबअलीखाँ याची आठवण मलाही झाली आहे ग्वाल्हेर गायकीचा सौम्य डौल, जयपूर गायकीचा लयीचा डोल आणि तानक्रियांची घोळी घालणारी व उलगडणारी ठेवण, आग्रा गायकीची ममेवर घातलेली झडप, किराणा जातीची नसली तरी तिच्या धर्तीवरची स्वरांची सवाई आणि तिच्यामधील प्रत्येक स्वराबरोबर त्याच स्वराच्या परिघातल्या वर्णाची सूक्ष्म हालचाल, वगैरे गोष्टीही नजरेतून सुटत नाहीत पण इतके झाले तरी त्यांच्या गायकीचा ताडवळा अमुक्या एकाच प्रकारच्या गायकीचा अथवा घराण्याचा छाप दर्शवीत नाही त्यांची गायकी कोठल्याही घराण्याची निशाणी दाखवीत नाही अगर कोठल्याही पूर्वसूरीचा सहीशिक्का बाळगीत नाही अगदीच सूक्ष्म पाहावयाचे म्हटले तर त्यातल्या त्यात जयपूर गायकीचा वास त्यात अधिक सापडेल. पण तो नुसता वासच काही झाले तरी त्यांच्या गायकीच कोणाशीही ओळख पटण्यासारखे नाते नाही, हेच शेवटी खरे समजावयास पाहिजे पूर्वपिढीतले सर्व गायक, आणि वेगवेगळ्या प्रणालींची घराणी, यांच्या पिढ्या येथे अशा रीतीने तुटल्या आहेत

याचे कारण असे की या सर्व गोष्टींचे सार घेऊनही त्यांचा असा काही ऐनजिनसी राधा त्यांनी बनविला आहे की, तो खास त्यांचा स्वतःचा समजला पाहिजे. अनेक गायकी आणि अनेक घराणी येथे त्यांनी एका मुशीमध्ये ओतून वितळविल्या आहेत त्या सर्वांचा मिळून त्यांनी एकच रस बनविला आहे त्यातले बहुतेक हीण काढून टाकले आहे आणि त्याला नवा आकार, नवी कल्पना, नवा हेतू आणि नवे प्रयोजन यांचा सान चढविला आहे आणि त्यामुळे त्याला एक प्रकारचा ताजेपणा, टवटवीतपणा आलेला आहे त्याचा नखरा अनावत आहे आणि नजाकत वेडावून टाकणारी आहे

निरनिराळ्या गायकीतील तत्त्वे आत्मसात करून कुमारांनी त्यांचा एक स्वतंत्र राधा बनविला आहे व अशा तऱ्हेने आपली गायकी त्यांनी समन्वयात्मक (eclectic) बनविली आहे असे वर सांगितले आता त्यांच्या गायकीच्या अंतर्गत रचनेची काही वैशिष्ट्ये सांगता आली तर पाहतो

चालू इतर गायकी व कुमारांची गायकी यामधला एक फरक अगदी प्रथमदर्शनीच लक्षात येतो आतापर्यंतची पद्धत अशी होती की, सम तालाच्या एका आवर्तनात सहसा पेचप्रसंग म्हणता येईल असा एखादाच असावयाचा म्हणजे त्या विलंबित लयीच्या प्रत्येक आवर्तनात प्रथम संथपणाने सुरवात करून, जरूर तर पहिल्या दोनतीन मात्रा जाऊ देऊन, हळूहळू उत्कंठनाचा उच्चतम बिंदू साधावयाचा आणि मगच त्या उत्कंठनाच विसर्जन करावयाच. उत्कंठेची पराकाष्ठा विजेच्या ताडाला लागून आघाच्या बिंदूवरच व्हावयाची आणि मगच विजेच तोंड घेऊन 'समावस्था' प्रस्थापित करावयाची म्हणजे

एका आवर्तनात एकदा उत्कठन व एकदा विसर्जन अशी क्रिया सहसा व्हावयाची. पण कुमारांच्या गायकीत एकाच आवर्तनात एकदा उत्कठन, पुन्हा अधिक उत्कठन आणि तिसऱ्या वेळेला दुसऱ्यापेक्षाही अधिक उत्कठन असा प्रकार होतो. पहिली दोन उत्कठने अविसर्जित अशी राहतात व तिन्ही उत्कठने एकापेक्षा एक वरचढ अशी होऊन मगच चिजेचे तोंड घेऊन समेवर या उत्कठनाचे विसर्जन होते म्हणजे दर वेळेला नवे उत्कठन, पहिल्याचे निराकरण व्हावयाच्या आधीच दुसरे उभे, व ते नाहीसे व्हावयाच्या आधी तिसरे तयार, अशी उत्कठनाची मालिका कुमार पेश करतात.

दुसरा एक विशेष असा की, त्यांची तान इतर गायकांच्या अपेक्षेने फारच जलद आहे. त्यांचा आवाज सुरेल असूनही त्यांची चपळाई विलक्षण आहे. त्यांची तानफिरतही त्यामुळे तितकीच जलद आहे हे वेगळे सांगण्याची जरूर नाही. अर्थात जलद तान हे आजकालच्या सर्वच गायकांचे सामान्य लक्षण झाले आहे असे म्हणता येईल. फैयाजखाँची गमकेची सावकाश तान, तशीच वझेबुवांची, अल्लादियाखाँची, केसरबाईंची, मोगूबाईंची, हिराबाईंची (त्या वयाची) तान हल्लीच्या जमान्यात मागे पडली आहे. आणि आज कोणीही गायक घेतला तर गमकेच्या तानेवरील त्याची श्रद्धाच नाहीशी झालेली आहे असे दिसून येते. तिशीचाळिशीच्या आतला, सावकाश गमकेच्या तानेवर श्रद्धा ठेवणारा गायक अगर गायिका लेखकाला अजून तरी भेटलो नाही. होते आहे ते बरे का वाईट हा येथे प्रश्न नाही; पण कुमारांच्या गायकीचे हे एक वैशिष्ट्य आहे हे नजरेआड करून चालणार नाही

उत्कठन ('ताण', 'टेन्शन') साधण्याची कुमारांची करामत काही असामान्य आहे. सहजासहजी प्रभावी ताण साधण्यात त्यांचा हातखंडा आहे. कोठून कोठे जातील त्याचा तर नियम नाहीच, पण बारीकसारीक गोष्टींतूनही ते अगदी अनपेक्षित ताण निर्माण करतात. चिजेच्या अक्षरांच्या उच्चारणातसुद्धा त्यांचे हे सामर्थ्य दिसून येते. चिजेच्या शब्दातले एखादे अक्षरच अशा काही ईर्ष्येने, आवेशाने आणि द्विरुक्त करून, आणि मुख्य म्हणजे असे करण्याचे आधी एक दीर्घ विराम घेऊन, ते उच्चारतात की, तेथेच विलक्षण ताण निर्माण होतो, आणि ऐकणारा स्तिमित होतो. अशा तऱ्हेचे चिजेचे उच्चारण दुसऱ्या कोणी केलेले माझ्या तरी आठवणीत नाही. आणि विशेष लक्षात ठेवण्याची गोष्ट ही की, ही उच्चारणजन्य उत्कठने त्यांच्या गायकीत विपुलतेने आणि जागोजाग पसरलेली असतात. त्यांच्या संगीताच्या दुवल्याशा मात्राखंडामध्येही अशी अनेक 'म्यूझिकल इव्हेन्ट्स' ठासून भरली जातात अक्षरांच्या उच्चारणातूनही 'ताण' निर्माण करण्याचे कुमारांचे सामर्थ्य एवढे मोठे आहे की, उच्चारणाची ही पद्धत त्यांनी बदलली तर त्यांच्या गायकीला निम्माअर्धा प्रभाव तरी कमी होईल असे मला तरी वाटते आणि या दृष्टीने कुमारांनी उच्चारणाची एक नवीन दिशा दाखवून एकूण हिंदुस्थानी संगीतच समृद्ध केले आणि त्याची पक्षाही वाढविली असे म्हटले पाहिजे.

कुमारांच्या गायकीच्या अंतर्गत रचनेची उपर्युक्त वैशिष्ट्ये लक्षात आली म्हणजे माझ्या मनात एक प्रश्न सारखा उभा राहतो तो असा की, आजच्या गतिमान काळाचे, धावपळीच्या व पेचप्रसंगांनी युक्त अशा समाजजीवनाचे प्रतिबिंबच तर त्यांच्या गायनात उमटलेले नाही? [२] कुमारांच्या तानेचा जलदपणा व आजच्या जीवनाचा वेग यांचा काही

संबंध आहे काय ? त्याच्या गाण्यातले ताण आणि आजच्या, विशेषत महायुद्धोत्तर, जीवनातले ताण आणि पेचप्रसंग यांचा केवळ काकतालीयच संबंध असेल काय ? संगीतात काही 'कालानुरूप मोडणी' (contemporary idiom) असते असे म्हणण्यात जीवनात झालेल्या बदल बरेचसे प्रतिबिंबित होते हे सूत्र इतके ढोबळपणाने खरे वाटते की त्यावर शंका वा घ्यावी हे कळत नाही पण जीवनातले नेमके कोणते बदल कलेत परावर्तित होतात आणि कोणत्या घटकांमार्फत आणि कसे होतात असा विचार करू लागलो तर या प्रश्नाची सहजासहजी उत्तरे मिळत नाहीत साहित्यासारख्या कलाच्या संदर्भात या प्रश्नाची सर्वसाधारणपणे समाधानकारक उत्तरे उपलब्ध करून घेणे निदान अधिक सोपे तरी असावे संगीताच्या बाबतीत त्या कलेच्या विशिष्ट स्वरूपामुळे या प्रश्नाची उत्तरे देणे फार अवघड आहे आणि ती देण्याचा मी प्रयत्नही करीत नाही पण कुमारांच्या गायकीत नव्या काळाची, बदलत्या, बदललेल्या जमान्याची काही विशेष छाया आहे असे राहून राहून वाटते संगीताच्या क्षितिजावर कुमारांचा उदय होण्याच्या सुमारास ही भावना बोललीही गेली आहे संगीताच्या धर्माला 'ग्लानी' आली आहे, तिच्यातून तिचा 'उद्धार' करावयाला हा थोड्‌प्याचा 'अवतार'च झालेला आहे असे विचार अशा वेळी स्फुरू लागतात कुमारांच्या बाबतीत हे सर्व होऊन गेलेले आहे पण असे उद्‌गार केवळ मित्रांच्या श्रद्धेच व भक्तीचे प्रतीक म्हणून बाजूला सारता येणार नाहीत त्याच्यामध्ये याहून वेगळा आणि महत्त्वाचा अर्थ असण्याचा संभव आहे 'प्रतिबिंबा'च्या या विषयाचा शोध सांगोपाने कुणीतरी घ्यावयास हवा आहे मी फक्त या ठिकाणी, मला असे काही 'प्रतिबिंब' कुमारांच्या गाण्यात दिसते, एवढेच म्हणण्याची परवानगी घेतो

कुमारांच्या गायकीचे आणखी एक वैशिष्ट्य असे की, स्वर-लयाशी सौख्य आणि इमान राखूनही त्यांनी आपल्या गायनामध्ये आक्रमकपणा आणला त्यांची गायकी इतकी युयुत्सु आणि विजिगीषु असण्याचे कारण तिच्यामधला असाधारण आवेश

आतापर्यंतचा इतिहास असा की गायकीमध्ये आक्रमकपणा आणण्याकरिता स्वराच्या सच्चाईकडे थोडातरी काणाडोळा करावा लागे एका माननीय घराण्यात आक्रमकपणाच्या मागे लागता लागता स्वराकडे थोडेसे तरी दुर्लक्ष करावे लागले आणि मग नाकात गाणं अगर आवाज दाबून लावणे वगैरे प्रकार त्या घराण्याच्या गायकामध्ये रूढ झाले त्याचे प्रत्यंतर आज्ही आपण पाहतोच पण कुमारांचा विशेष असा की आक्रमकपणा आणण्या करिता त्यांना स्वराशी बेइमानी करावी लागली नाही, अगर लयाशी एकरूप होण्यात कुचराई करावी लागली नाही, आणि तरीही त्यांना आक्रमकपणाचा उच्चांक गाठता आला असामान्य आवेशाला आतरिक प्रेरणाही तितकीच शक्तिशाली असावी लागते कुमारांच्या गाण्यामधले सर्व सामर्थ्य त्यांच्या त्या शक्तिशाली प्रेरणेतच सामावलेले आहे पण प्रश्न असा पडतो की प्रेरणेतल्या या असामान्य शक्तीचे आदिकारण तरी काय असावे ? कोठलीही समर्थ अभिव्यक्ती तितक्या समर्थ प्रेरणेखेरीज साधूच शकणार नाही

कुमारांच्या गायकातला हा अनन्यसाधारण आवेश अथवा vitality ही जन्मजात खरी पण तिचे पोषण मात्र माझ्या समजुतीप्रमाणे तरी त्यांच्या लोकगीतांच्या अनुनया मुळेच झाले आहे हा विचार तर्कसिद्धित नसेल पण दुसरे काहीच कारण मला तरी

सागता येत नाही. गाण्याची स्फूर्ती संगीताच्या वाहत्या गंगेतून घेणे वेगळे आणि तिच्या उगमस्थानचाच जीवनरस प्राशन करणे वेगळे संगीताच्या दुथडी वाहणाऱ्या लोटात त्याला मिळालेले अनेक छोटेछोटे प्रवाह सामील असतात हे खरे, पण त्याबरोबरच त्यात गाळसाळही पुष्कळच साचून साचून येत असतो आणि गायकाच्या मनावर तो संस्कार केल्याखेरीज राहत नाही पण संगीताच्या निर्मळ झऱ्यातच ज्यांनी आपला कंठ भिजविला त्याचे तेज आणि सत्त्व श्रेष्ठच असणार यात काय नवल ? लोकगीत हे song of the soil च असते ते 'असंस्कृत' असले तरी त्याची जीवनशक्तीच इतर कशाहीपेक्षा मोठी असते कारण प्रत्यक्ष भूमीमधील जीवनसत्त्वेच ते शोषून घेत असते या रांगड्या लोकगीतांची स्वर लावण्याची पद्धत, आघात आणि ठसकाच काही वेगळा असतो आणि म्हणून कुमारांच्या गाण्यातील ठोसपणाला, vitality ला, अधिक धार आणण्याचे श्रेय त्यांच्या लोकसंगीतातील अवगाहनालाच दिले पाहिजे असे वाटते त्यांच्या गायनातले घरेचसे 'पुकार' आणि 'आघात' हे खास लोकगीतांतून आले आहेत याच प्रत्यंतर कोणालाही त्यांची एखादीच मैफल ऐकली तरी सहज घेता येईल

संगीतातली सर्जनशक्ति नवे स्वरसंयोग जमवून आणण्यात असते नव्या स्वर संयोगाच्या कल्पना स्फुरणे हीच संगीतातील प्रतिभा कुमारांच्या गायनाचं ठळक वैशिष्ट्य हे की त्यांना नव्या व तेजस्वी कल्पना वैपुल्याने आणि विलक्षण वेगाने सुचतात

आणि एकूणही कुमारांच्या गाण्याचा रंग अनोखा आहे, exotic आहे त्यांची गायकी वेगळी वाटते ती मुख्यत यामुळे, असे वाटते. त्यांच्या गाण्याचे मुख्य आकर्षण यात सामावलेले आहे. आपण ऐकत असलेले स्वर आणि स्वरावली पूर्वी आपण कधी ऐकल्याच नव्हत्या इतक्या अगदी ऐन ताज्या वाटतात त्या केवळ नवीन आहेत एवढेच मला म्हणावयाचे नाही कारण सर्वसाधारण प्रतिभेचा गायकही दर बैठकीत नवीन काही करीत असतोच कुमारांच्या नावीन्यातहा वेगळा जोप, वेगळी मुलावण असते ते गाणे कुठल्या तरी वेगळ्या भूभागातून आले आहे असे वाटते आणि असे असूनही गूढपणाने ते आपल्या हृदयाच्या तारा छेडीत असते कुमारांच्या गाण्यात जे चैतन्य, जी vitality आहे तिचे हेही एक कारण असू शकेल.

मूळचे मानसिक सामर्थ्य, भूमीची प्रसवशक्ति व सत्त्व आणि आजपर्यंतच्या संस्कारित, विस्तारित, विकसित अशा गायकीचे मनोहर मिश्रण कुमारांच्या गायकीत झाले आहे आणि त्याच्याच जोडीला त्यात सारा समकालिक असा प्रतिसादही उमटलेला आहे

काळाची गती जसजशी बदलत जाणार तसतसे संगीतातही परिवर्तन होणार आणि ज्याअर्थी गेल्या पंधराबीस वर्षांपासूनच्या काळाची गतीच एकदम विलक्षण वाढली आहे, त्याअर्थी तिचेही रूपांतर संगीतामध्ये होणारच या तत्त्वाचे प्रत्यंतर कुमारांच्या गायकीमध्ये दिसतेच पण कुमारांची गायकी सोडाच—तिचा सर्व प्रवास त्यांनी स्वत च काढलेल्या आडमार्गाने झाला—पण ज्यांनी पूर्वपरंपरेतच शिक्षण घेतले व त्याच परंपरेत जे वाढले त्यांच्यातसुद्धा हा बदल होत जातो आणि जाणवतोही याच उदाहरणच द्यावयाचे झाले तर • श्री० भीमसेन जोशी यांचे देता येईल किराना घराण्याची भरपूर तालीम मिळालेली व ती रिम्न अगदी रक्तात भिनलेली पण काळाच्या नवीन गतीचा परिणाम त्यांच्यावरही झालेला

आहे. घरंदाजपणाची बंधने त्यांनी पुष्कळ शिथिल केली आहेत आणि काही तर अजिबात तोडून दिली आहेत. आणि नवीन कालाची नवीन मूल्ये स्वीकारली आहेत. वेगळ्या वळणाची असली तरी चमत्कारदार जलद तान त्यांचीही वैशिष्ट्य झाले आहे. मूळच्या किराना गायकीत त्यांनी इतका फरक केला आहे की त्यांच्या गायकीतले किराना घराण्याचे वैशिष्ट्यही नाहीसे झाले आहे अशा अनेकांनी तक्रारी केल्या आहेत. हा इतका बदल घरंदाज परंपराप्रियतेला मंजूर नाही. पण कदाचित हीच गोष्ट म्हणजे चालू जमान्याला मंयादी थरा बदलून, त्यांच्या उमाप यशाला कारण झाला आहे असे मला वाटते.

ओघात आले म्हणून सांगतो. आजकालच्या गायकांत कुमार आणि भीमसेन जोशी या दोघांचेही यश मोठे आहे. आणि उदाहरणे तर फारच उद्बोधक आहेत. दोघांचीही गायकी कालमानानुरूपच आहे, पण कलेचा प्रवास मात्र दोघांचा अगदी उलट दिशेने झाला. कुमारांच्या प्रवासाची सुरवात बंडखोरपणातून झाली, म्हणजे घरंदाज गायकीच्या इन्कारापासूनच त्यांनी आपले प्रस्थान ठेवले, तर भीमसेनांनी आपली सुरवात परंपरागत घरंदाज गायकीच्या अंगिकारातून केली. इतकेच नव्हे, तर ती प्रथम रक्तात मुरवून घेतली. कुमारांचा पुढचा पुढचा प्रवास स्वतःच निर्माण केलेल्या कलात्मक बंधनांचा स्वीकार करीत करीत झाला, तर भीमसेन जुन्या बंधनातून आपली सुटका करून घेण्याच्या मार्गाला लागले. म्हणजे कुमारांचा प्रवास 'स्वातंत्र्यातून बंधनाकडे' चालला आहे; तर भीमसेनांचा प्रवास 'बंधनातून स्वातंत्र्याकडे' चालला आहे. कुमार स्वतःच्या भूमिकेचे वर्णन 'बंधनयुक्त स्वातंत्र्य' असे करतात, भीमसेन तसे करतात ते अजून बोलले नाहीत. पण त्यांच्या कृतीवरून ती 'स्वातंत्र्ययुक्त बंधन' अशी आहे असेच दिसून येते. हे दोन्हीही कलावंत अशा रीतीने सामोरे आलेले दिसतात. पण त्यांच्या प्रवासाचे मार्ग एकरूप न होता समांतरच राहतील हे उघड आहे. कारण प्रत्येकाचा आवाज, धारणा, मनोवृत्ती, प्रतिभा आणि एकूण व्यक्तिमत्त्व वेगळे आहे.

कुमारांची नवीन गायकी मूळ धरील का? म्हणजे ती 'घराणे' म्हणून प्रस्थापित होईल काय? प्रश्न मोठा कठीण आहे. एक वेळ असेही वाटते की, त्यांच्याजवळची गुणवत्तेची समृद्धी बव्हंशी व्यक्तिगतच आहे. त्यामुळे त्यांचा 'कायदा' होऊ शकणार नाही. त्यांच्यासारख्या आवाजाची व गुणवत्तेची माणसे दुर्मिळ असतात. निदान आजपर्यंत तरी होती. रहिमतखाँचे घराणे झाले नाही, भास्करबुवांचे झाले नाही आणि नाट्यसंगीतात का होईना, नारायणराव बालगंधर्वांचेही झाले नाही. तरी पण कुमारांच्या आवाजाशी, त्यांच्या चपळाईशी साधर्म्य असणारे गायक आजकाल बरेच दिसतात. तेव्हा अशा तऱ्हेचे शिष्य व प्रशिष्य लाभले तर त्यांचे स्वतंत्र घराणे म्हणून अर्थातच होऊ शकेल.

घराणे होईल किंवा नाही हा प्रश्न संशयास्पद असला तरी एक श्रेष्ठ कलाकार म्हणून अभिजातपणाची प्रतिष्ठा त्यांना मिळेलच मिळेल असे वाटते. आजही ती बरीचशी मिळाली आहे. 'बरीचशी' म्हणण्याचे कारण असे की, अजूनही परंपरेत शिकलेल्यांचा असा एक वर्ग आहे की जो त्यांच्या गाण्याने स्तिमित होतो, ते जन्मांतरीचे गुण घेऊन आले आहेत असे म्हणतो, त्यांच्या नवनिर्मितीविषयी आदर बाळगतो, आणि तो एक

'जीनियस'च आहेत असेही समजतो; तरी पण त्यांच्या गाण्याने आम्हाला 'समाधान' मात्र होत नाही अशी हळूच तक्रार करतो. पण या बाबतीत नेहमी एक गोष्ट लक्षात ठेवावयास हवी ती अशी की, कोठल्याही नवीनतेला, नवनिर्मितीला वीस पंचवीस वर्षं म्हणजे साधारणतः एका पिढीचा काळ तरी उमेदवारीतच काढावा लागतो. नवनिर्मितीचा हा जवळजवळ अलिखित असा कायदा आहे. त्या दृष्टीने कुमारांच्या उमेदवारीचा काल केव्हापासून मोजावयाचा असा एक प्रश्न आहे. माझ्या मते तो १९४७ पासून म्हणजे त्यांना स्वत:ला गाणे आल्याचा साक्षात्कार झाला तेव्हापासून मोजावा. म्हणजे त्यांच्या उमेदवारीची सतरा वर्षे होऊन गेली. त्या दृष्टीने पुढील पाचदहा वर्षांत त्यांची गायकी आपोआप कायम व्हावी असा क्यास करावासा वाटतो.

या उमेदवारीच्या काळात नवीन अनुभव येत जातो तसतशी कलेच्या बंदिशीतही सुधारणा होत जाते. मनाशी धरलेले आडाखे पुनःपुन्हा तपासून घेतले जातात. बदलत्या काळाची चाहूल लागत जाते श्रोत्यांच्या अपेक्षांची समजही वाढत वाढत जाते. आणि स्वत:च्या कलेची आणि एकूण गायकीची स्थिर मूल्ये कोणती याचीही समज पडत जाते. आणि ऐन तारुण्यातली भडक, अतिरंजित आणि अविवेकी भावना पुष्कळच सौम्य व्हावयाला लागते. जसजशी ही क्रिया होत जाते तसतशी या नवीन गायकीत स्वत: गायकच बदल करीत जातो आणि मगच ती नवीन गायकी स्थिर होऊन तिला अभिजातपणाची प्रतिष्ठा लाभते. तोपर्यंत राहिलेला दुराराध्य आणि असमाधानी वर्ग कालांतराने नाहीसा होत जातो.

अल्लादियाखाँ व अब्दुल करीमखाँ या गेल्या पाचपन्नास वर्षांतल्या नवनिर्मात्यानाही या प्रक्रियेतून आणि उमेदवारीतून जावे लागले आहे, हे लेखकाच्या पिढीला चांगलेच माहीत आहे. प्रथम नित्येक वर्षे हेटाळणी व तिरस्कार, नंतर त्यांच्या गायकीच्या सामर्थ्याचा पुसट स्वाद, नंतर वेगळ्या आविष्काराची जिज्ञासा, नंतर तिच्या खास आनंदाची समज व जाणीव आणि मगच मान्यता व प्रतिष्ठा हा प्रवास कोठल्याही नवनिर्मात्याला चुकला नाही या तुलनेने कुमारांची यात्रा फारच सुखाची झाली असे म्हटले पाहिजे. हेटाळणी व तिरस्कार राहोच, पण उलट प्रथमपासून त्यांचे कौतुकच होत गेले. श्रोत्यांनी डोक्यावरच घेतले, आणि टीका झाली तीसुद्धा अगदीच सौम्य स्वरूपाची झाली.

लेखकाच्या पिढीला अगर परंपरेत ज्याचे शिक्षण झाले आहे त्या तरुण वर्गालाही कुमारांच्या गाण्यात 'खुबी' नसावी याचे आश्चर्य वाटावयास नको. पंचविसावर वर्षे त्यांना नावाजीत आलो, कौतुक करीत आलो तरी मला स्वत:लाही त्यांच्या गाण्याचे खास आकर्षण परवापरवापर्यंत वाटले नाही. पण कुठलीही नवीन गोष्ट समजावून घ्यावी लागते. डोक्याला थोडा शीण द्यावा लागतो. त्या नवीन पद्धतीच्या काही चिजा गळ्यावर चढवून घेण्याचा प्रयत्न करावा लागतो त्यातल्या नवीन वाटा थोड्या अगवळणी पाडाव्या लागतात हे सर्व मीही काही आपणहून केलेले नाही अलीकडे अलीकडेपर्यंतही माझी अनुत्सुकता जागृत होती. पण गेल्या काही वर्षांपासून माझ्या खास मित्रमंडळीवर कुमारांनी एवढी छाप पाडविली की, मीही त्यापासून स्वत:ला बचावू शकलो नाही. मित्रांच्या घरी कुमारांच्या-एवढा राबता होता की, त्यांच्या घरी ते पाहुणे म्हणून राहावयाला आले म्हणजे तो

सगच ठरावयाचा. मित्रांच्या घरी नेहमीच कुमार गावयाचे व मीही त्या सर्व प्रसंगी हजर असावयाचा. त्यामुळे कुमारांच्या गायकीशी परिचय वाढत गेला पुढे पुढे कुमार माझ्याही घरी ठाण देऊ लागले आणि तो सण-समारंभ माझी सर्व मुलेही हौसेने साजरा करू लागली कुमार आले म्हणजे त्यांच्या उत्साहाला पारावार नसतो आणि त्यांच्या मनावर कुमारांच्या गायकीचा प्रभाव एवढा आहे की बोलावयाची सोय नाही आणि आता गेल्या दोन वर्षांत सर्वांत धाकट्या धारावेरा वर्षांच्या चिरंजिवानी कुमारांच्या बहुतेक चिजा त्याच्या खास ढगाने आत्मसात केल्या आहेत आणि तो त्या रात्रंदिवस म्हणत असताना माझ्या कानावर सतत पडत असतात कुमारानी आमच्या घरावर अशा रीतीने आक्रमण केल्यामुळेच मला त्यांच्या गायकीची चव अधिकाधिक समजत गेली आणि अगदी प्रस्तुत प्रस्तावना लिहिण्यापर्यंत माझी मजल गेली सांगण्याचा उद्देश असा की, कुमारांच्या गायकीची खास चव समजण्याकरिता मीही काही मुद्दाम प्रयत्न केले आहेत अथवा माझ्याकडून ते झाले आहेत तेव्हा टीकाकारांनाही नवीन गायकी, नवीन चाल व त्याची नवीन मूल्ये ही समजण्याकरिता थोडा तरी डोक्याला व गळ्याला शीण घेतल्याशिवाय त्यातली खास चमत्कृती कळणार नाही आणि कदाचित माझ्या सारख्यांच्या अवजड गळ्यावर त्यांची गायकी न चढली तरी त्यातल्या खास वेगळ्या अशा चवीची गोडी लागेलच लागेल

इतके सर्व जरी विवेचन मी केले तरी मनामध्ये अशी एक रुखरुख राहिली आहे की, कुमारांच्या गायकीचे मर्म अगदी बोट ठेवून मला सांगता आले नाही त्या गायकीतच असा काही पाऱ्यासारखा गुण आहे की, त्याची कांती मोहिनी घालते, चापल्य नजरेत भरते आणि हातात आहे तोपर्यंत वजनदार वाटते, पण पकडीत धरायला मात्र फार कठीण असते निसटून जाण्याची त्याची करामतही मोठी असते आणि एकदा निसटून गेले म्हणजे हातावर काहीच संस्कार राहत नाही निसटण्याची त्याची क्रियाही अशी विलक्षण की, कोठल्या दिशेने ते निसटणार याचाही अंदाज लागत नाही कुमारांची गायकी अशीच mercurial आहे ती कानावर पडत असते तोपर्यंत तिच्या तेजाने ऐकणारा मोहित होतो तिचे वजन व बोजाही त्याला जाणवतो पण कानावरून ती निसटूनच जाते आणि चिकित्सा करावयालाही हातात सापडत नाही कारण तिची चपलताही तितकीच अनपेक्षित असते पुढची जागा काय येणार आहे, हरकत की तान, की बोलतान काही सांगता येत नाही मग ती कोणत्या जातीची येणार याचा अंदाज बांधणे तर दुष्करच माझी तर गोष्ट सोडाच. माझे सांगीतिक जीवन एका विशिष्ट वाटेनेच गेले आहे झाले आहे ते शिक्षण परंपरेत झाले आहे मनावरचे संस्कार पूर्वपिढीचे आहेत शिवाय थोडाबहुत गाणारा असलो तरी फक्त गायकच आहे पण ज्याना कुमारांबरोबर साथच करावयाची असते अशा वादकानासुद्धा ही अडचण भासते वादक हा जात्याच गायकापेक्षा सूक्ष्म नजरेचा असावा लागतो कारण साथ करताना त्याला सूरन्‌सूर टिपून घ्यावा लागतो त्यालादेखील जेव्हा ही अडचण भासते तेव्हा मलाही ती भासावी यात नवल नाही एका वादकाने तर मला सांगितले की, इतर कोणाच्या बरोबरही साथ केली तर दहापैकी नऊ अंदाज बरोबर येतात पण कुमारांच्या बरोबर

साथ करताना कदाचित दहाही चुकतील  एकूण त्याचे बरेचसे गाणे गळाला लागत नाही '
हे खरे, पण आश्चर्याची गोष्ट अशी की तरुण गायकाच्या गळ्यावर थोडेफार ते चढतेच,
रसिकांना गुंगविते आणि श्रोत्यांना तर ते फारच मोहिनी घालते

कुमारांना आज इतकी वर्षे मी न्याहाळीत आलो आहे  जन्मांतरीच्या गुणांचा त्यांनी केलेला उत्कर्ष पाहून आनंदित होत आलो आहे  आणि माझ्या असे ध्यानात आले आहे की ते कलावंत म्हणून जसे मोठे आहेत तसे माणूस म्हणूनही मोठे आहेत  कुमारांचे संभाषणातले साधे बोलणेचालणेही मधुर, सुसंस्कृत आणि चतुर असते इतके की, कोठल्याही समाजामध्ये त्यांचे व्यक्तिमत्त्व उठूनच दिसावे. त्यांच्याजवळ अनेक गुण आहेत  तसेच अंगी नाना तऱ्हेचे हुन्नरही आहे  कोठल्याही बिकट प्रसंगाला धडपणाने तोंड देण्याचे मानसिक सामर्थ्य आहे आणि सारासारविचार करण्याचे आणि बिनचूक निर्णय तत्काल घेण्याचे अगर देण्याचे बौद्धिक बळही तसेच आहे  विचारवंत आणि शहाणी माणसेही दिपे डुबवडून जातील तेथे कुमार अचूक निर्णय घेतात असाही अनुभव आहे  आणि एरवी जीव घेणाऱ्या शारीरिक व्याधीने ग्रस्त असतानाही त्यांनी आपल्या जीवनाचा तोल सांभाळून धरला आहे  अंतर्यामीचा व्यथित असलेला आणि 'शोक' हेच नाव चिजेत धारण करणारा हा माणूस कमालीच्या धीराचा आहे  आणि कलावंताने कलेला वाहून घ्यावे पण जीवनात वाहवले जाऊ देऊ नये, तोल ढळू देऊ नये, हा आचारही ते पाळीत आलेले आहेत

कुमारांच्या सर्व कर्तबगारीच्या पाठीमागे त्यांची सौंदर्यशोधक दृष्टी आणि विशेष तीव्र प्रकारची संवेदनक्षमता आहे  या संवेदनक्षमतेमुळेच जेथे जेथे, ज्या ज्या गवयामध्ये आणि ज्या ज्या गायकात त्यांना एखादा का होईना गुण दिसला तेथून तो त्यांनी शोषून घेतला  आपणाला मिळालेल्या लवमात्र लाभाचेही ऋण अत्यंत मोकळेपणाने मान्य करताना त्यांचा अहंकार त्यांच्या कधी आड येत नाही  आणि त्यांची सौंदर्यवेधी दृष्टी नुसती गायनाकडेच लागलेली असते असे नव्हे तर एकूण नादविश्वाकडेच लागलेली असते  नुसते मानवी स्वरच नव्हे तर निसर्गातले वेगवेगळे नादही  एखाद्या भणंग भिकाऱ्याच्या स्वरातली गमत तर त्यांना दिसतेच, पण एखाद्या रानपाखराच्याही  आणि मग त्या आवाजाचा पाठलाग करणारे त्यांचे वेडे कान त्यांच्या पायांना जंगलातूनही ओढीत नेतात

या वेडामुळेच ते लोकगीतांकडे ओढले गेले आणि ते इतके की, निरनिराळ्या प्रदेशाची लोकगीते जुन्या परिचयाचे मित्र ओळखावेत तसे ओळखू शकतात  एखाद्या ठसक्या वरून ते गीत कोणत्या प्रदेशातले आहे हे सांगू शकतात  एखाद्याने लोकगीत म्हणताना चुकीचा आघात दिला तर त्याची दुरुस्ती करू शकतात  या वेडामुळेच अनंत प्रकारची भजने त्यांनी ऐकली आहेत, त्यांचा विपुल आस्वाद घेतला आहे आणि त्यांच्यातले सुवर्णकण संग्रहात साठवून ठेवले आहेत  त्यांच्या संवेदनक्षमतेने त्यांना फार श्रीमंत केले आहे

आणि हे म्हटल्यावर त्यांची संगीतावर अमाप, एकमार्गी निष्ठा आहे हे निराळे सांगण्याचे कारण उरत नाही. कारण ते त्याच विश्वात रंगले आहेत  त्यांच्या जीवनाला

दुसरी इतिकर्तव्यता नाही. संगीतात त्यांचा जीव अव्यभिचारीपणे गुंतलेला आहे तो त्यांचा निदिध्यास आहे

त्यांनी केलेला स्वतःच्या गायकीचा विस्तार व विकास पाहून मी प्रभावित झालो आहे. आणि त्यांची नवीन गायकी, नवीन राग व नवीन बंदिशी यांनी आकर्षित झालो आहे स्वतःच्या गायकीत ते करीत असलेल्या आकारतत्त्वाचा उत्कर्ष डोळ्यांनी पाहत आलो आहे, कानांनी ऐकत आलो आहे तिची विकासक्षमताही मला भारावून सोडते "मी नेहमी काही ना काहीतरी नवीन नवीन प्रयोग करण्याच्या उद्योगात असतो" हे त्यांचे वाक्य माझ्या कानात सारखे निनादत असते गायकीच्या सर्व अंगांचा उत्कर्ष साधू इच्छिणाऱ्या या कलावंताला 'करावयाचे ते पुढेच आहे' अशीही जाणीव आहे

या संदर्भात त्यांनीच केलेली एक कविता (चीज नव्हे) सांगण्यासारखी आहे कारण तिच्यामध्ये त्यांच्या मनोवृत्तीचे प्रतिबिंबच पडलेले आहे ती कविता अशी

"मैं था जिसके पीछे पीछे
अब मैं उसके आगे आगे
देखा जब मैं आगे पीछे
दीखा सब कुछ आगे आगे !"

ही कविता अर्थातच त्यांच्या स्वतःच्या सांगीतिक विकासाचा एक चालू टप्पाच सांगते "ज्यांच्या मागे मागे मी फिरत आलो त्यांना मागे टाकून मी आता पुष्कळच पुढे गेलो आहे पण जेव्हा मी मागे, पुढे, अवती, भोवती पाहिले तेव्हा मला दिसून आले की सर्व काही अजून पुढेच आहे" असा भावार्थ

बसल्याबसल्या सहज सुचलेल्या या चार ओळी त्यांनी मला गमन म्हणून सांगितल्या त्यातली 'पीछे पीछे, आगे आगे आणि आगेपीछे' ही कोटी तर मला आवडलीच, पण त्यात त्यांच्या विकसनशील जीवनाचे सारही सामावलेले आहे म्हणूनही ती हृद्य वाटली एखाद्या अस्सल बाधणीच्या चिजेने दंग करावा, चटका लावावा तसे झाले इतके टप्पे ओलांडून तरी करावयाचे ते सर्व अजून पुढेच आहे ही जाणीव मनात बाळगणारा कलावंत क्वचितच आढळतो आणि त्या दृष्टीने या कवितेत त्यांच्या यशाचे मर्म व भावी विकासाची ग्वाहीही सहजासहजी सामावली गेली आहे कुमारांना त्यांच्या कार्यात आणि भावी प्रवासात, तसेच प्रस्तुतच्या संग्रहालाही, अधिकाधिक यश प्राप्त होवो अशी इच्छा व्यक्त करून ही लांबलेली प्रस्तावना येथेच संपविणे उचित होईल

छंदोरत्नी
४८४/६८ मित्रमंडळ कॉलनी
पर्वतीदर्शन, पुणे ९

—वा० ह० देशपांडे

# स्वरलेखनाच्या चिन्हांचा परिचय

१. री ग ध नि या स्वराच्या खाली '–' असे रेषाचिन्ह असेल तर ते स्वर कोमल असतात. उदाहरणार्थ : री ग ध नि जर असे चिन्ह नसेल तर ते स्वर शुद्ध किंवा तीव्र असतात.

२. कोमल किंवा शुद्ध मध्यमाला कोणतेच चिन्ह नसते. तीव्र मध्यमाच्या वर '।' असे उभ्या रेषेचे चिन्ह असेल. उदाहरणार्थ : मं.

३. मंद्र सप्तकाच्या स्वराच्या खाली '.' असे बिंदूचे चिन्ह असेल. उदाहरणार्थ : नि ध प म.

४. तार सप्तकाच्या स्वराच्यावर '.' असे बिंदूचे चिन्ह असेल. उदाहरणार्थ : सा रीं गं मं प.

५. मध्य सप्तकाच्या स्वराच्या वर अथवा खाली कोणतेच चिन्ह असणार नाही. उदाहरणार्थ : सा री ग म प ध नि.

६. ‿ असा अर्धचंद्रचिन्हाच्या आत समाविष्ट असलेले स्वर एका मात्रेच्या अवधीत असतात. उदाहरणार्थ : मप मपध मपध– मपधनि मपधनि, सानिधप.

७. ज्या स्वरावर ⁀ असे उलटे अर्धचंद्राकार चिन्ह असेल तिथे एका स्वरावरून दुसऱ्या स्वरावर जाताना 'मींड' घेऊन किंवा कमानी बनवून गेले पाहिजे.

८. स्वराना अलंकारीक बनविण्यासाठी, तसेच रागस्वरूप शुद्ध ठेवण्यासाठी जे स्वर असतात ते स्वराच्या वर डाव्या बाजूला दाखवले आहेत. त्याना 'कण' स्वर

ग सा

असेही म्हणतात. उदाहरणार्थ : सा री ग और प ध सा.

९. स्वराच्या पुढे '–' असे रेषाचिन्ह असेल तर ते चिन्ह तो स्वर पुढे ओढण्यासाठी असते. उदाहरणार्थ : म –––.

१०. गीतातील शब्दाच्या अक्षराचा मात्रा-काल वाढविण्यासाठी 'ऽ' असे अवग्रह-चिन्ह उपयोगात आणले आहे. उदाहरणार्थ : आऽऽऽरेऽऽ.

११. तालाची पहिली मात्रा, जिला 'सम' असे म्हणतात ती, '×' अशा चिन्हाने दाखविली आहे. तसेच तालाची खाली, म्हणजे तालाचा अर्धा भाग

झाल्यावर जो दुसरा अर्धा भाग सुरू होतो तो, '०' या चिन्हाने सूचित केली आहे.

१२. ताल जितक्या मात्राचा असेल, आणि त्याचे विभाजक किंवा खंड जसे असतील, त्याप्रमाणे 'बंदीश' किंवा गीते स्वरबद्ध करण्यात येतात किंवा लिहिली जातात.

१३. स्वराच्या खाली '–' असे रेषाचिन्ह असेल आणि वर '।' असे उभ्या रेषेचे चिन्ह असेल तर तो स्वर कोमल आणि शुद्ध स्वराच्या मधले अंतर असेल.

# तालांचा परिचय

## रूपक ताल

रूपक ताल सात मात्रांचा असतो. या तालामध्ये तीन खंड असतात. पहिला खंड तीन मात्रांचा आणि दुसरा व तिसरा खंड दोन दोन मात्रांचा असतो. पहिल्या मात्रेवर सम असते. चौथ्या व सहाव्या मात्रेवर आघात असतो. या तालाचा स्वभावच मध्य लयीचा असतो.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| तिन् | तिन् | ना | धी | ना | धी | ना |
| × | | | २ | | ३ | |

## झपताल

झपताल दहा मात्रांचा असतो. या तालाचे चार खंड असतात. पहिल्या आणि तिसऱ्या खंडामध्ये दोन दोन मात्रा असतात. पहिल्या मात्रेवर सम आणि सहाव्या मात्रेवर खाली असते. तिसऱ्या आणि आठव्या मात्रेवर आघात असतो. या तालाचा विशेष गुण ठाय आणि मध्यलय आहे.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| धी | ना | धी | धी | ना | ती | ना | धी | धी | ना |
| × | | २ | | | ० | | ३ | | |

## एकताल

एकताल बारा मात्रांचा असतो. या तालाचे सहा खंड असतात. प्रत्येक खंड दोन मात्रांचा असतो. पहिल्या मात्रेवर सम आणि सातव्या मात्रेवर खाली असते. पाचव्या, नवव्या आणि अकराव्या मात्रेवर आघात असतो. विलंबित, ठाय, मध्य आणि द्रुत लय हा या तालाचा विशेष गुण होय.

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| धिन् | धिन् | धागे | तिरकिट | तू | ना | क | त्ता | धागे | तिरकिट | धिन् | ना |
| × | | ० | | २ | | ० | | ३ | | ४ | |

## त्रिताल

त्रिताल हा सोळा मात्रांचा असतो. या तालाचे खंड चार असतात. प्रत्येक खंड चार मात्रांचा असतो. पहिल्या मात्रेवर सम आणि नवव्या मात्रेवर खाली असते. पाचव्या आणि तेराव्या मात्रेवर आघात असतो. या तालाचा विशेष गुण विलंबित, ठाय, मध्य आणि द्रुत लय आहे.

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ |
| धा | धिन् | धिन् | धा | धा | धिन् | धिन् | धा | धा | तिन् | तिन् | ता | ता | धिन् | धिन् | धा |
| × | | | | २ | | | | ० | | | | ३ | | | |

## छकताल

हा ताल चौवीस मात्रांचा आहे. छकतालाचे चार खंड असतात. प्रत्येक खंड ६ मात्रांचा असतो. पहिल्या मात्रेवर सम आणि तेराव्या मात्रेवर खाली असते. सातव्या आणि एकुणिसाव्या मात्रेवर आघात असतो. विलंबित आणि ठाय लय हा या तालाचा विशेष गुण होत.

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
| धा | – | धिन् | – | धा | – | धा | – | धिन् | – | धा | – |
| × | | | | | | २ | | | | | |
| १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ | २० | २१ | २२ | २३ | २४ |
| धा | – | तिन् | – | ता | – | ता | – | धिन् | – | धा | – |
| ० | | | | | | ३ | | | | | |

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | शुद्ध |
|---|---|---|
| २ | १० | म – ध म |
| २ | १२ | ग गम री ग |
| ३ | ७ | ग री – नि ध |
| ३ | ७ | ग री सा सा |
| ६ | १२ | म<br>रींग म म म |
| ६ | १४ | –म ग रीं नि |
| १५ | १३ | नि<br>सा – सा – |
| १५ | २० | म प गरीं रींसा |
| २० | ८ | नि<br>सा – |
| २५ | ९ | नि– ध– प– |
| २७ | १८ | ध<br>प प ग म |
| २९ | १६ | सानि निप पम मग |
| ३० | १४ | सानिनि निपप मगग सानिसा |
| ३१ | ९ | –सा निध प |
| ४२ | ६ | नि री, ग म, प, प |
| ४३ | १२ | गरीं निसा सा– |

| पृष्ठ | ओळ | शुद्ध |
|---|---|---|
| ४८ | १८ | पमं पप री– (ग) |
| ६६ | १४ | ध नि –सा मग |
| ७४ | २ | मप, प, ध, ध |
| ८३ | ९ | सा, –, सारी, नि धध, –, प, – |
| ९९ | १३ | सारींसासा,ध निम,प |
| ११५ | ९ | – सासा –नि धप |
| ११५ | १६ | – सासा –नि धप |
| १६५ | १६ | म ग मं प |
| १६५ | १८ | ग मं प ध नि सा |
| १६७ | १४ | री ग –म प |
| १७७ | ३ | स्वर |
| १७७ | २६ | नि – – नि ध प म प म – – म |
| १७८ | २ | सा<br>म – – ग रीं सा |
| १८३ | १७ | ऽ मो पे ऽ |
| १८३ | १९ | त ऽ ऽ, म न में ऽ ऽ, सु |
| १८६ | २ | ग री – – सा नि – – |
| १८६ | ३ | सा रीं – सा नि |
| १८६ | १९ | री ग री री सा नि |

# राग तोडी, ताल त्रिताल, लय मध्य

देवो मोहे धीर माई सरसती देवी
तुमरो गुन रटरट दिन जुग बीते ॥
शोक मन माँगे आसीस तोरी
एक बार मोहे ग्यान मिलोरी ॥

## स्थाई

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | | नि |
| मं | धनि सां निध मं | ध – ध नि | ध म – ध | सा – सा, नि |
| दे | धोऽऽ मोऽ हे | धी ऽ र मा | ऽ ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ई, स |
| | ३ | × | २ | ० |
| | ध म री ग | री – सा – | सा री ग – | मं म ध नि |
| | र स ती ऽ | दे ऽ वी ऽ | तु म रो ऽ | गु न र ट |
| | ३ | × | २ | ० |
| | ध म री ग | री सा – – | सारीगम गरी, गम धनी धम | |
| | र ट दि न | जु ग ऽ ऽ | बीऽऽऽ ऽऽ, ऽऽ तेऽऽऽ | |
| | ३ | × | २ | |
| | धनीसारी | गग री ग नीधमग रीसारीग, म | | |
| | ऽऽऽऽ | ऽऽऽऽ ऽऽऽऽ ऽऽऽऽ, दे | | |
| | | ० | | |

## अंतरा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मं | ध सा सा सा | री – सा ध | – सा सा – | ग री सा ग |
| सो | क ऽ म न | मा ऽ गे आ | ऽ सी स ऽ | तो ऽ री ए |
| | ३ | × | २ | ० |
| | रीं सा – नि | ध ध ध म | सारीगमं गरी, गमं धनीधमं धनीसारी | |
| | क बा ऽ र | मो हे आ न | मिऽऽऽ ऽऽ, ऽऽ ऽऽ ऽऽ लो ऽऽऽ | |
| | ३ | × | २ | |
| | गगरींसा नीधमग रेसारीग, म | | | |
| | ऽऽरीऽ ऽऽऽऽ ऽऽऽऽदे | | | |
| | ० | | | |

# राग तोडी, ताल त्रिताल, लय मध्य और द्रुत

पूछो काय मोसे, मोसे रे
आज शुभ दिन है राजन
मन में भयो आनंद रंगीला रे ॥
कुसुम रंग छायो केसूला
बन में जारे तू लेता आजो रे ॥

## स्थाई

नि
सा | सा ध - ध म | ध - - - | म - ध म | धनि सा निध सा |
पू | छो का ऽ य मो | से ऽ ऽ ऽ | ऽ ऽ मो से | रेऽ ऽ ऽऽ, पू |
३ × २ ०

नि नि
सा ध - ध मं | ध - - - | म - ध म | धनि सा री ग |
छो का ऽ य मो | से ऽ ऽ - | ऽ ऽ मो से | रेऽ ऽ ऽ, आ |
३ × २ ०

- री - सा | सा - सा साती | ग गुमं री ग | री - -, सा |
ऽ ज ऽ शु | भ ऽ दि नऽ | है ऽऽ रा ज | न ऽ ऽ, म |
३ × २ ०

सा ध
री ग - म | म ध - नि | ध ध निसा सा | रींसानि धपम गरीसा, सा |
न म ऽ भ | यो आ ऽ न | द र गीऽ ला | रेऽऽ ऽऽऽ ऽऽऽ, पू |
३ × २ ०

## अंतरा

ग | मध निनि धम | धनि सा - - | सा - सा सा | रीं सां -, सा |
कु | सुम रऽ गऽ | छाऽ ऽ ऽ ऽ | यो ऽ के सू | ला ऽ ऽ, ब |
३ × २ ०

नि
री ग - री | ग म ध म | ध सा - सा | रींसा निध पम, ध |
न में ऽ जा | रे तू ऽ ले | ता आ ऽ जो | रेऽ ऽऽ ऽऽ, पू |
३ × २ ०

## राग विलासखानी तोडी, ताल त्रिताल, लय मध्य

नयन में जल भर आये देखन तोहे
काहे पिया नहीं देत दरस मोहे ॥
शोक मन छाये, याद तरसाये
कैसे धरूं धीर, देवो दरस मोहे ॥

### स्थाई

| | | | |
|---|---|---|---|
| ग री -नि ध | नि सा -री ग | ग - ग री | ग रीं सा सा |
| न य ऽन में | ज ल ऽभ र | आ ऽ ये दे | ख न तो हे |
| ० | ३ | × | २ |
| ग री सा - | नि सा -रीग | रीग म ग री | ग री -सा सा |
| का ऽ हे ऽ | पि या ऽन हीं | देऽ ऽ त द | र स ऽमो हे |
| ० | ३ | × | २ |

### अंतरा

| | | | |
|---|---|---|---|
| ग री सा -री | गप धनि--ध | सां - सां रीं | सां गं रीं सां |
| शो ऽ क ऽम | नछा ऽऽ ऽऽ ये | या ऽ द त | र सा ऽ ये |
| ० | ३ | × | २ |
| सांरीं गं रीं नि | सां ध - म | पध नि ध म | ग रीग -रीसा |
| कैऽ ऽ से ध | रूं धी ऽ र | देऽ ऽ वो द | र सऽ ऽमो हे |
| ० | ३ | × | २ |

# राग अहीरभैरव, ताल त्रिताल, लय मध्य और द्रुत

कैसे मनाऊँ रे
सुझाऊँ अब कस तोहे रे
समुझाय हारी हारी रे ॥
पूछो ना मोसे, बवरे पिया
करो ना सदेहा मोपेरे
समुझाय हारी हारी रे ॥

## स्थाई

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | ग | |
| प ध | निसा धप मप म | म — — — | पम गम री सा | ग — म, म |
| कै ऽ | ऽऽ सेऽ ऽऽ म | नाऽ ऽ ऽ | ऽऽ ऽऽ ऊँ ऽ | रे ऽ ऽ, सु |
| | ३ | × | २ | ० |
| | धप पम गम गरी | रीसा — — सा | ग म ध — | धम म —, ध |
| | झाऽ ऊँऽऽऽ अऽ | नऽऽऽ क | स तो है ऽ | रेऽ ऽ ऽ, स |
| | ३ | × | २ | ० |
| | नि सा — री | ग — म — | मप धप, पध निध | धनि सासा निध, निसा |
| | मु झा ऽ य | हा ऽ री ऽ | हाऽ ऽऽ, रीऽ ऽऽ | रेऽ ऽऽ ऽऽ, कैऽ |
| | ३ | × | २ | ० |
| | — धप मप म | | | |
| | ऽ सेऽ ऽऽ म | | | |
| | ३ | | | |

## अंतरा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सा | सासा धप मप म | म — — ग | मपध निसा धनि | री — सा, नि |
| पू | छोऽ नाऽ ऽऽ मो | से ऽ ऽ अ | बरेऽ ऽऽ पिऽ | या ऽ ऽ, पू |
| | ३ | × | २ | ० |
| | सासा धप मप म | म — — ग | म पध निसा धनि | री — सा, सां |
| | छोऽ नाऽ ऽऽ मो | से ऽ ऽ अ | ब रेऽ ऽऽ पिऽ | या ऽ ऽ, क |
| | ३ | × | २ | ० |

| | | | |
|---|---|---|---|
| सा | प म | | |
| ग रीं – सानि़ | नि़सा – ध म | प – गम रीग | री सा –, ध |
| रो ना ऽ मऽ | देऽ – हा ऽ | मो ऽ पेऽ ऽऽ | रे ऽ ऽ, स |
| ३ | × | २ | ० |
| नि़ सा – री | ग – म – | मप धप पध निध | धनि सासा निध सा |
| म झा ऽ य | हा ऽ रो ऽ | हाऽ ऽऽ रोऽ ऽऽ | रेऽ ऽऽ ऽऽ कै |
| २ | × | २ | ० |

## राग ललित, ताल त्रिताल, लय मध्य और द्रुत

ये मेरो मन बसियारे
तोरे अँखियांपे वारी जाऊं रे ॥
हाल-बेहाल भई रे बनवारी
नेक नजर मोपे राखो, वारी जाऊं रे ॥

### स्थाई

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | ग | |
| ग | मंध मंधमं | म – – – | म – ग री | मं –धमं मग–, नि |
| ये | ऽऽ मेरोम | न ऽ ऽ ऽ | ऽऽऽ ब सि | या ऽरेऽ ऽऽऽ, तो |
| | ३ | × | २ | ० |
| | – री ग री | म – गरी | री ग म मं | नि,निध धमं मंमम,ग |
| | ऽ रे अं खि | यां ऽ पेऽ | वा री जा ऊं | रे,ऽऽ ऽऽ ऽऽऽ ये |
| | ३ | × | २ | ० |

### अंतरा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मं | | | | म |
| ध | –ध मं धध मं | म – – – | मंध मंध रींनि | रीग मं मं मं |
| हा | ऽल बे हाल भ | ई ऽ ऽऽ | रेऽ ऽऽबन | वाऽ ऽ री, ने |
| | ३ | × | २ | ० |
| | –म ग री नि | ध मंम ग | री ग म मं | नि,निध धमं मंमम ग |
| | ऽक न ज र | मो पे रा खो | वा री जा ऊं | रे ऽ ऽ ऽऽ ऽऽऽ ये |
| | ३ | × | २ | ० |

# राग गुणकरी, ताल त्रिताल, लय द्रुत

आव म्हारा मनबसियारे
दरसबिना रे तरस रही मैं ॥
निरख-निरख नित रैन दिना रे
याद करत अब तरस रही मैं ॥

## स्थाई

| | | | |
|---|---|---|---|
| म पधुप पम मग | गरी रीसा –री सा | प – – – | म पधुप पमम री |
| आ ऽऽव म्हाऽ राऽ | म ऽ न ऽ ऽ ब सि | या ऽ ऽ ऽ | ऽऽऽऽ रेऽऽ ऽ |
| ० | ३ | × | २ |
| – मम प धु | सां – सां – | प धुसां धु धु | पधु पधु पमम री |
| ऽ दर स बि | ना ऽ रे ऽ | त रऽ स र | हीऽ ऽऽ मैंऽऽऽ |
| ० | ३ | × | २ |

## अंतरा

| | | | |
|---|---|---|---|
| | | | सा |
| म म प धु | सा सा सा सा | – री –री री | री – सा – |
| नि र ख नि | र ख नि त | ऽ रै ऽन दि | ना ऽ रे ऽ |
| ० | ३ | × | २ |
| धु – धु धु | सा सां धु धु | – धुधु धु धु | पधु पधु पमम री |
| या ऽ द क | र त अ ब | ऽ तर ऽ स | र हीऽ ऽऽ मैंऽऽ ऽ |
| ० | ३ | × | २ |

# राग अल्हैयाबिलावल, ताल त्रिताल, लय द्रुत

लेता जाज्यो म्हारो दे सने सो
तू तो जाण्यो म्हारो दुखरो, अव ये ॥
ऊभीरी है कयो मग में हूँ तो
विरहा अगिन मन में, अव ये ॥

## स्थाई

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | प - ध | नि̣ | |
| प ध | पम, म ग री ग | प नि – नि | सां – ध नि̣ | धग –, प ध |
| ले ता | जाऽ,ऽ ज्यो ऽ म्हा | रो दे ऽऽ स | ने ऽ ऽऽ ऽ | सोऽ ऽ, ले ता |
| | ० | ३ | × | २ |
| | | प ध | नि̣ | |
| | पम, म ग री ग | प नि – नि | सां – ध नि̣ | धप –, री ग |
| | जाऽ,ऽ ज्यो ऽ म्हा | रो दे ऽऽ स | ने ऽ ऽऽ ऽ | सोऽ ऽ, तू तो |
| | ० | ३ | × | २ |
| | प पध नि̣ध धप | पध ग प ध | पध निसां सा सा | गम ग,ग, प ध |
| | जा ण्योऽ ऽऽ म्हाऽ | रोऽ ऽ दु ख | रोऽ ऽऽ अ ब | येऽ ऽ,ऽ, ले ता |
| | ० | ३ | × | २ |

## अंतरा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | री | | |
| ग नि̣ | ध प ध म | गम ग ग प | धनि सांनि सां ध | नि̣ध नि̣ग, ग ध |
| ऊ भी | री है ऽ क | योऽ ऽऽ म ग | मेंऽ ऽऽ ऽ हूँ | तोऽ ऽऽ, वि र |
| | ० | ३ | × | २ |
| | धनि सांरीं गं सा | नि̣ध धप म ग | पध निसां, सा सा | गम ग,ग, प ध |
| | हाऽ ऽऽ ऽ अ | गिऽ नऽ म न | मेंऽ ऽऽ, अ व | येऽ ऽ,ऽ, लै ता |
| | ० | ३ | × | २ |

## राग जीवनपुरी, ताल त्रिताल, लय विलंबित

श्याम बजा बाँसुरियारे
सुन लेहूं रे धुन तोरी, नीकोरे नीको लागेरे ॥
आछी-आछी तान सुरन कन तोरे
मोह लेत मोहे लय रूप
धुन तोरी नीको रे नीको लागेरे ॥

### स्थाई

–, – – –, – – –, प धु नि सां – नि धु, प प – |
ऽ ऽ, ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ ऽ ऽ, श्याऽ ऽ म ऽ ब ऽ, जा ऽ ऽ |
३

नि –, – – –, – – नि धु –, नि धु – प –, – – |
बाँ ऽ, ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ |
×

धु म, – – धुप, – – नि सां नि नि, – – नि धु, नि धु |
सु ऽ, ऽ ऽ रि ऽ, ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ |
२

प –, – – प धु, म – मप, पधुप, ग, – – री री –, – – |
या ऽ, ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ रे ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ |
०

सा –, – – म –, ग – री री –, सा – – –, म री – |
ऽ ऽ, ऽ ऽ सु ऽ न ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ ऽ ऽ, ले ऽ ऽ |
३

म –, – – –, – – प म –, पम – प –, – – |
हूं ऽ, ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ रे ऽ ऽ, ऽ ऽ ऽ ऽ ऽ, ऽ ऽ |
×

प –, – – प –, – – नि धु –, नि धु – प –, – – |
धु ऽ, ऽ ऽ न ऽ, ऽ ऽ तो ऽ ऽ, ऽ ऽ ऽ री ऽ, ऽ ऽ |
२

बनुपगगविद्य

ध म, — —   मप, नि धप—   पसां—, — — —   सां—, सां—
ऽ ऽ ऽ ऽ   नीको, रे ऽ ऽ ऽ   ऽऽऽ, ऽ ऽ ऽ   नीऽ, कोऽ
०

सांनि—, रींसां रीं—   नि ध—, प— —   धम—, पध निसां   —निध, पप—
ला ऽ ऽ, ऽ ऽ ऽ   गेऽऽ, ऽऽऽ   रेऽऽ श्याऽऽम   ऽचऽ, जाऽऽ
२

अंतरा

— —, — —   — —, — —   — —, मप   —नि ध, निधप—
ऽऽ, ऽऽ   ऽऽ, ऽऽ   ऽऽ, आछी   ऽआऽ, ऽऽछीऽ
३

सां—, — —   सां—, — —   निधधप, सां—   — —, सांसां
ताऽ, ऽऽ   नऽ, ऽऽ   सुऽरऽ, नऽ   ऽऽ, कन
×

रींमंपंगं, — —   रीं—, सां—   रींरींसांनि, धप—प   निनिधप, मगरीसा
तोऽऽऽ, ऽऽ   रेऽ, ऽऽ   मोऽहले, ऽऽऽत   मोऽहेल, यरूऽ प
२

नि
रीम, पध   मप, निधप—   पसां— —, — —   सां—, सां—
धुन कोरी   नीको, रेऽऽऽ   ऽऽऽऽ, ऽऽ   नीऽ, कोऽ
०

सानि— —, रींसारीं—   निध—, प—   धम—, पधनिसा   —निध, पप—
लाऽऽऽ ऽऽऽऽ   गेऽऽ, रेऽ   ऽऽऽ, श्याऽऽम   ऽचऽ, जाऽऽ
३

# राग जीवनपुरी, ताल त्रिताल, लय मध्य और द्रुत

अरि येरी आलरी
पिछुहारे श्याम खरे बोलायोरी ॥
अरि वोके माथे सोहे है पिसारो
कर मुरली अधर धर बोलायोरी ॥

## स्थाई

| | | | |
|---|---|---|---|
| – पम धप प | सां – – – | रेंनि – सा रीं | ध – प – |
| ऽअरि ये ऽ री | जा ऽ ऽ ऽ | ऽऽ ऽ ऽ ऽ | ग ऽ री ऽ |
| ३ | × | २ | ० |

| | | | |
|---|---|---|---|
| – मम धप प | नि – –नि धप | पध म मप धप | (म) ग री – म |
| ऽ पिछु हाऽ रे | श्याऽ ऽम खऽ | रेऽ ऽ बोऽ ऽऽ | ला यो ऽ री |
| ३ | × | २ | ० |

## अंतरा

| | | | |
|---|---|---|---|
| – मप निध प | सा – सा, (रीं) सां | (नि) ध प सां – | सां रीं निध प |
| ऽ अरि वोऽ के | मा ऽ थे, सो | हे ऽ है ऽ | पि सा रो ऽ ऽ |
| ३ | × | २ | ० |

| | | | |
|---|---|---|---|
| – पम धप प | निसां निनि निध धप | प, ध प धप | (म) ग री – म |
| ऽ कर मुऽ र | लीऽ ऽऽ अऽ धऽ | र ध र बोऽ | ला यो ऽ री |
| ३ | × | २ | ० |

## तराणा, राग जीवनपुरी, ताल त्रिताल, लय द्रुत

तदानि तारे, तारे दानि रे, तनन देरेना देरेना
ओदानि दानि तारे दानि, तननन देरेना ॥
दीं तानों तानों, तों तों तननारे
देदेरे तदारे, तननन देरेना ॥

### स्थाई

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| – | नि॒ | ध॒ | प | सां | – | – | – | रीं | नि॒ | सा | रीं | ध॒ | – | प | नि॒ |
| ऽ | त | दा | नि | ता | ऽ | ऽ | ऽ | रे | ऽ | ता | रे | दा | ऽ | नि | रे |
| ३ | | | | × | | | | २ | | | | ० | | | |
| – | नि॒ | ध॒ | प | सा | – | – | – | रीं | नि॒ | सा | रीं | ध॒ | – | प | नि॒ |
| ऽ | त | दा | नि | ता | ऽ | ऽ | ऽ | रे | ऽ | ता | रे | दा | ऽ | नि, | रे |
| ३ | | | | × | | | | २ | | | | ० | | | |
| – | नि॒ | ध॒ | प | ग॒ | री | – | म | – | म | प | प | म | प | नि॒ | ध॒ |
| ऽ | त | न | न | दे | रे | ऽ | ना | ऽ | दे | रे | ना | ओ | दा | नि | दा |
| ३ | | | | × | | | | २ | | | | ० | | | |
| | | | | | | | | | | | | | नि॒ | | |
| प | सा | – | ध॒ | प | रीं | – | सां | ग॒ | रीं | नि॒ | सा | रीं | ध॒ | – | प |
| नि | ता | ऽ | रे | ऽ | दा | ऽ | नि | त | न | न | न | दे | रे | ऽ | ना |
| ३ | | | | × | | | | २ | | | | ० | | | |
| – | नि॒ | ध॒ | प | | | | | | | | | | | | |
| ऽ | त | दा | नि | | | | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | | | | | | | |

### अंतरा

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| – | री | म | प | सा | – | ध॒ | प | सां | – | सा | – | सा | सा | सा | सां |
| ऽ | दीं | ता | नों | ता | ऽ | नों | ऽ | तों | ऽ | तों | ऽ | त | न | ना | रे |
| ३ | | | | × | | | | २ | | | | ० | | | |
| | | | | | | | | | | | | | नि॒ | | |
| – | रीं | म | प | ग॒ | रीं | – | सा | ग॒ | रीं | नि॒ | सा | रीं | ध॒ | – | प |
| ऽ | दे | दे | रे | त | दा | ऽ | रे | त | न | न | न | दे | रे | ऽ | ना |
| ३ | | | | × | | | | २ | | | | ० | | | |
| – | नि॒ | ध॒ | प | | | | | | | | | | | | |
| ऽ | त | दा | नि | | | | | | | | | | | | |
| ३ | | | | | | | | | | | | | | | |

# राग देशकार, ताल झपताल, लय मध्य

आयो मिलबे को जी
शुभ घरी, शुभ दिन को
शुभ संदेस सो लायो जी ॥
कछु न रहे मन मे जो
चाहे सो बोलिलो
आज मन खोइलो जी ॥

## स्थाई

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | री | | | |
| सा– | धसा | प– | गप | धप | ग– | सा– | रीध | सा– | सा– |
| आऽ | ऽऽ | योऽ | ऽऽ | मिल | वेऽ | ऽऽ | कोऽ | ऽऽ | जीऽ |
| × | | २ | | | ० | | ३ | | |
| सा– | साध | सा– | सा– | –– | प– | पग | प– | ध– | प– |
| शुऽ | मऽ | घऽ | रीऽ | ऽऽ | शुऽ | मऽ | दिऽ | नऽ | कोऽ |
| × | | २ | | | ० | | ३ | | |
| | | | | रीं | | | | | |
| सा– | री– | गप | ग– | सासा | सा– | धसा | प– | धग | पध |
| शुऽ | मऽ | सऽ | देऽ | ऽस | सोऽ | ऽऽ | लाऽ | ऽऽ | योजी |
| × | | २ | | | ० | | ३ | | |

## अंतरा

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ग– | प– | ध– | सां– | सां– | सां– | सा– | सारींध– | सा– | सां– |
| कऽ | छुऽ | नऽ | रऽ | हेऽ | मऽ | नऽ | मेंऽऽऽ | ऽऽ | जोऽ |
| × | | २ | | | ० | | ३ | | |
| | | प | | | | | | | |
| सा– | –– | ध– | ध– | –– | सां– | धसां | प– | ध– | –– |
| चाऽ | ऽऽ | हेऽ | सोऽ | ऽऽ | बोऽ | ऽऽ | लिऽ | लोऽ | ऽऽ |
| × | | २ | | | ० | | ३ | | |
| | | | री | | | | | | |
| सां– | री– | ग–रग | गसा | सां– | सां– | धसां | प– | धग | पध |
| आऽ | ऽऽ | जऽऽऽ | मऽ | नऽ | खोऽ | ऽऽ | इऽ | लोऽ | ऽजी |
| × | | २ | | | ० | | ३ | | |

## राग देशकार, ताल त्रिताल, लय मध्य

जा जारे भौंरा जारे विदेसा
संदेसा लेना आजो सैयाँ का ॥
पूछो जो तोहे हलिया मोरा
कहे दे मनमां विरोग भया ॥

### स्थाई

| | | | | |
|---|---|---|---|---|
| सा | ध –धस पग,प ध | सां – ध सां | धप,प पग – पध प | ग –सा सा, सा |
| जा | जाऽरेऽ ऽऽ,भौ रा | जा ऽ ऽ ऽ | रेऽ,ऽ ऽऽ ऽ ऽऽवि | दे ऽऽ सा, सं |
| | ३ | × | २ | ० |
| | | | | री |
| | ध़ सा – सा | ध –पसां धसां | धप,प प,ग-गप– धप | ग – –सा, सा |
| | दे सा ऽ ले | नाऽआऽ ऽऽ | जोऽ,ऽऽ,ऽऽसेऽयाँऽ | का ऽ ऽऽ, जा |
| | ३ | × | २ | ० |

### अंतरा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | सा सां | | | |
| ग | प ध – ध | सां – – ध | सां रींगंरीं सांसां ध | धसांध प,प– –, सा |
| पू | छोजो ऽतो | हे ऽ ऽ ह | लि याऽऽ ऽऽ मो | राऽऽ ऽऽ ऽ, क |
| | ३ | × | २ | ० |
| | | | ध | री |
| | ग –प – प | ध –ध – सां | प – गप धप | ग – सा, सा |
| | है ऽदे ऽ म | न ऽमां ऽ वि | रो ऽ गऽ भऽ | या ऽ ऽ, जा |
| | ३ | × | २ | ० |

